


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

छपाई, कागद वगैरेंच्या वाढलेल्या खर्चामुळे 'नवभारत'ची वार्षिक वर्गणी ऑक्टोबर २००८ पासून रु. ३००/- इतकी करण्यात आलेली आहे. कृपया याची नोंद घ्यावी. वर्गणीदार आणि वाचक यांनी सहकार्य करावे अशी विनंती आहे.

मुखपृष्ठ :
२३ जानेवारी २००५ रोजी मोईरंग कांगला येथे आयएनए मेमोरीयलचे उद्‌घाटन करण्यात आले.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६२ । अंक १ । ऑक्टोबर २००८
आश्विन / कार्तिक शके १९३०
वार्षिक वर्गणी ३०० रुपये.
या अंकाची किंमत रु. २५/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक व प्राज्ञपाठशाळा मंडळ सहमत असतीलच, असे नाही.

## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे. हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

**प्राज्ञपाठशाळामंडळ**
**अध्यक्ष व विश्वस्त :**
सरोजा भाटे

**संपादक :**
श्री. मा. भावे

**संपादक मंडळ :**
वसंत पळशीकर, सुधीर रसाळ,
सीताराम रायकर, यशवंत कळमकर

**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

18/10/06

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियत-कालिकाला अनुदान दिले असले तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका



## लेखकांचा परिचय

❑ **प्रा. म. अ. मेहेंदळे**

माजी प्राध्यापक, संस्कृत विभाग व माजी सहयोगी प्रमुख संपादक, संस्कृत कोश विभाग, डेक्कन कॉलेज, पुणे; संपादक, महाभारताचा सांस्कृतिक कोश, भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिर, पुणे. वैदिक वाङ्मयातील प्रश्नोत्तरे (१९८०), भारतीय द्यूत (१९९०), पू. विनोबा-कृत ऋग्वेद-सारचे मराठी भाषांतर (१९८२), जरथुश्त्राच्या गाथांचे मराठी भाषांतर (१९९४), या ग्रंथांचे लेखक; नवभारतांत लेखन.

*पत्ता :* बी-४, प्रबोधन हाऊसिंग सोसायटी, ६१ ए/९-१०, कर्वे रोड, एरंडवणे, पुणे ४११ ००४.

❑ **प्रा. प्रसन्नकुमार अकलूजकर**

वृत्तपत्रलेखक, केसरीतील माजी संपादक आणि आता पुणे विद्यापीठाच्या वृत्तपत्रविद्या विभाग येथे प्राध्यापक.

*पत्ता :* वृत्तपत्रविद्या विभाग, रानडे इन्स्टिट्यूट, फर्ग्युसन कॉलेज रस्ता, पुणे-४११ ००४.

❑ **श्री. विश्वनाथ खैरे**

केंद्रिय सार्वजनिक बांधकाम खात्यातून मुख्य अभियंते म्हणून निवृत्त; संस्कृत, मराठी, तामिळ या भाषांच्या आंतरसंबंधाचा विशेष अभ्यास, प्राचीन मिथ्यकथा, महाकाव्ये – पुराणे, प्राचीन भारतीय संस्कृती व परंपरा या विषयांमध्ये वैशिष्ट्यपूर्ण मौलिक लेखन; एकलव्य, युरेका, वंशाचा व्यास (नाटके), भारतीय मिथ्यांचा मागोवा, ज्ञानेश्वरांचे चमत्कार इत्यादी ग्रंथांचे कर्ते.

*पत्ता :* ३७४, सिंध सोसायटी, पुणे – ४११ ००७.

❑ **प्रा. विठ्ठल दहिफळे**

प्राध्यापक, राज्यशास्त्र विभाग वरिष्ठ, पीपल्स कॉलेज, नांदेड. साधना मासिक व दै. लोकमत यामध्ये लेख प्रकाशित.

*पत्ता :* पीपल्स कॉलेज, नांदेड (मराठवाडा).



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# संगीताची उत्पत्ती आणि आवाजाचे धर्म

## प्रा. प्रसन्नकुमार अकलूजकर

ध्वनी आणि नाद या संकल्पनांच्या विवेचनानंतर संगीताच्या उत्पत्तीकडे वळणे आवश्यक आहे. संगीताची निर्मिती कशी झाली याबद्दलची चर्चा अभ्यासकांनी तपशिलात जाऊन केली आहे. भारतीय संगीताचे उगमस्थान किंवा मूळ सामगायनात आहे असे मानले जाते. भारतात संगीताची आराधना अतिप्राचीन काळापासून चालत आली आहे. संगीत ही दैवी व पवित्र कला मानली गेली. जे जे उदात्त, दिव्य व पवित्र त्याचा उगम देवतेकडून झाला असे मानण्यात येते. 'शिव' ही संगीताची देवता मानली जाते. नृत्य, वाद्य यांचीही सुरुवात 'शिव' या देवतेपासून झाल्याचे ग्रंथकारांनी लिहून ठेवले आहे. नाशानंतर शंकराने आनंदीत होऊन केलेले नृत्यच तांडवनृत्य म्हणून वर्णिले जाते. वीणा या वाद्याची निर्मितीही शंकराने केली असे मानले जाते. निद्रिस्त पार्वतीला जागविण्यासाठी शंकराने तिच्या आकृतीसारखीच वीणा निर्माण केली. हेच वीणावाद्य व त्याचे वादन म्हणजे वीणावादन होय. देवलोकात शिवाने संगीत व नृत्याची आराधना केली. हे संगीत 'स्वर्गीय' म्हणून संबोधिले गेले. तेच नारदाने भूतलावर म्हणजे पृथ्वीवर आणले. ऋषी-मुनींनी ते नारदाकडूनच ग्रहण केले. देवदेवतांना संतुष्ट करण्यासाठी पृथ्वीवर संगीत (गायन), वाद्यवादन व नृत्य या कलांची आराधना होऊ लागली. यज्ञयागात संगीत हे देवताप्रसादासाठी आवश्यक मानले जाऊ लागले. त्यासाठीच सामवेदाची निर्मिती झाली.

सामवेदातून संगीताची निर्मिती कशी झाली, सामवेदाचे गायन कसे चालत असे, सामगायनाच्या जाती व प्रकार किती, सामगायक कोण होते याबद्दलचा तपशील अतिशय रंजक आहे; मात्र भारतीय संगीताचा उगम सामवेदातूनच होतो असे ठामपणे मानले जात नाही. सामवेद हे भारतीय संगीताचे मूळ नाही. सामपूर्वकाळातही संगीत व नृत्याचे संदर्भ आढळत असल्यामुळे काही अभ्यासक आदिमानवाच्या संस्कृतीत संगीत व नृत्याचे मूळ असल्याचे मानतात. सामपूर्व गायनात मोहोंजोदाडो संस्कृतीसारख्या संस्कृतींचा उल्लेख करण्यात येतो. सिंधू संस्कृतीमध्ये गीत, नृत्य यांचा प्रचार आढळतो असे कै. नरहर कुरुंदकर यांच्यासारख्या नाट्यशास्त्राच्या अभ्यासकांना वाटते. भारतीय संगीत अतिप्राचीन लौकिकगायनापासून सुरू होते. संगीताच्या मूळ रूपाचा शोध घेताना मतमतांतरे आढळून येतात; याचे कारण पुराण आणि इतिहास या दोन्हींमध्ये अभ्यासकांनी केलेली गल्लत होय असे 'विश्रब्धशारदा' (खंड दोन)साठी टिपा लिहिणाऱ्या (आणि 'लयतालविचार' सारखा ग्रंथ सिद्ध करणाऱ्या) डॉ. शरदचंद्र विष्णू गोखले यांनी म्हटले आहे. कै. कुरुंदकरांच्या विचारांचा प्रतिवाद करताना 'गोदातटीचे कैलासलेणे' या ग्रंथातील डॉ. गोखले यांचे विवेचनही तेवढेच महत्त्वाचे ठरते.

कै. कुरुंदकर काय किंवा डॉ. गोखले काय, भारतीय संगीताचे मूळ ग्रीक संगीतात आहे किंवा काय, तसेच मुस्लिम परंपरा, संस्कृती यांच्यात त्याची काही चिन्हे सापडतात किंवा काय, याचा शोध घेण्याचा उभयतांनी प्रयत्न केलेला दिसतो. प्रबंध, धृपद, ख्याल या गायकीचा मागोवा घेताना आपण याच लेखमालेत त्याचा ऊहापोह करणार आहोतच; तूर्त 'सामा'शी असणारा संगीताचा संबंध विद्वानांनी कसा मांडला आहे ते पाहू. 'संगीतरत्नाकरा'चा अनुवाद करणारे डॉ. ग. ह. तारळेकर यांनी याचे विवेचन उत्तम प्रकारे केले आहे. त्यांच्याही पूर्वी म्हणजे १९५० च्या दशकात श्रोताचार्य म. म. धुंडिराजशास्त्री बापट यांनी 'वैदिक संगीत' या छोटेखानी पुस्तकात सामवेद आणि संगीत यांचा विचार केला आहे. 'पुणे भारत गायन समाज ग्रंथमाले'मध्ये हे

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पुस्तक १९५४ साली प्रसिद्ध झाले आहे. 'वैदिक संगीत अथवा संगीताचे प्राचीन स्वरूप' असे त्याचे पूर्ण शीर्षक आहे. हा ग्रंथ म्हणजे छोटा प्रबंधच आहे. सुमारे ९४ पानांच्या क्राऊन आकाराच्या या पुस्तकातील बापट शास्त्र्यांचे विवेचन व विश्लेषण अभ्यासकांच्या दृष्टीने महत्त्वाचे ठरते. संगीताचे प्राचीनत्व मांडताना त्याचा उगम यज्ञसंस्थेत असल्याचे श्रौताचार्य बापट प्रारंभीच नमूद करतात. (याच बापटशास्त्र्यांचा संदर्भ कै. शरच्चंद्र विष्णू गोखले देताना आढळतात.)

वैदिक वाङ्मय हे प्राचीन आर्यांचा धर्म, विद्या व कला यांचे उगमस्थान आहे. अत्यंत प्राचीन अशा ऋग्वेदाचा काळ लोकमान्य टिळकांसारख्या वेदाभ्यासी पंडितांनी इसवी सन पूर्व आठ हजार वर्षांचा ठरविला आहे. याचाच अर्थ जवळ जवळ दहा हजार वर्षांपूर्वीच्या वैदिक वाङ्मयाच्या काळात संगीत कलेचा परिचय तत्कालीन आर्यांना होता असे बापटशास्त्र्यांनी म्हटले आहे. या संदर्भात पुढे जाऊन ते म्हणतात, "अखिल वैदिक वाङ्मयाचा मुख्य प्रतिपाद्य विषय 'यज्ञप्रधानधर्म' असल्यामुळे यज्ञसंस्थेत संगीताचा जन्म झाला व यज्ञसंस्थेनेच संगीताचे संवर्धन व पोषण केले; ही गोष्ट वैदिक वाङ्मयाचा सूक्ष्म अभ्यास करणाराला कबूलच करावी लागेल. वैदिक वाङ्मयात ऋक्, यजु व साम असे असे तीन भेद किंवा प्रकार आहेत. काही ठरावीक अक्षरांचे पाद किंवा चरण एकमेकास जोडून तयार केलेल्या छंदोबद्ध किंवा पद्यात्मक वाङ्मयास ऋक् किंवा ऋचा अशी संज्ञा असून अनियमित अशा काही अक्षरांच्या लहान-मोठ्या वाक्यरचनेने बनलेल्या वाङ्मयास 'यजु' असे म्हणतात. निरनिराळ्या स्वरांचे आलापन करून ज्या ऋचा गायिल्या जातात. त्या ऋचांच्या समूहात्मक वाङ्मयास 'साम' असे म्हणतात. ऋक्, यजु व साम या तीन प्रकारच्या वाङ्मयसमूहांनाच कृष्णद्वैपायन व्यासांनी अनुक्रमे 'ऋग्वेद', 'यजुर्वेद' व 'सामवेद' अशी नावे दिली आहेत. ऋग्वेद व यजुर्वेद हे दोन्ही पाठ्य असून सामवेद हा पाठ्य व गेय असा द्विरूप आहे. सामवेदाचे पाठ्य स्वरूप गौण असून गेय स्वरूप मुख्य आहे."

साम व संगीत यांची व्याख्या व स्वरूप स्पष्ट करण्याचा प्रयत्न बापटशास्त्र्यांनी याच छोटेखानी ग्रंथात अतिशय, साधेपणाने व सुलभतेने केला आहे. याच ग्रंथात ते म्हणतात, "सा आणि अम या दोन शब्दांच्या संयोगाने साम हा शब्द बनला आहे. 'सा' म्हणजे केवळ पठनाने अभिव्यक्त होणारी ऋचा व अम म्हणजे आलापात्मक स्वर होय. अर्थात्, पठनात्मक अशा ऋचेशी आलापात्मक स्वराचा होणारा जो संयोग, ते 'साम' अशी सामाची व्याख्या करता येते. अर्थात आलापयुक्त स्वरात गायिलेली जी ऋचा तिला साम अशी संज्ञा आहे." तात्पर्य, साम म्हणजे वैदिक गीत किंवा गाणे होय. परंतु केवळ 'गीत' हे संगीत नाही. 'गीतं वाद्यं तथा नृत्यं त्रयं संगीतमुच्यते' म्हणजे गीत, वाद्य व नृत्य अशा तिन्हींच्या संयोगाला संगीत म्हणतात. कारण केवळ गीतात सम्यकत्व येत नाही. वादन व नर्तन या दोन कलांच्या साहचर्याने गाइल्या जाणाऱ्या गीतालाच सम्यकत्व प्राप्त होते. थोडक्यात, अशा प्रकारचे सम्यकत्व ज्यात आहे, किंवा असते, तेच संगीत होय. वाद्य हे गीतानुयायी आहे. त्यामुळे वाद्य व नृत्य यापेक्षा 'गीत' म्हणजे गायन हेच श्रेष्ठ आहे असे 'संगीतरत्नाकरा'त म्हटले आहे. 'संगीत' संकल्पनेत गायनाला प्राथम्य आहे; म्हणजेच मुख्यत्व आहे, आणि म्हणूनच ते श्रेष्ठ आहे. अर्थात गीत म्हणजे केवळ गेय काव्यपंक्ती नव्हेत. श्रोत्यांचे मनोरंजन करणाऱ्या स्वरांचा संदर्भ किंवा स्वरमाला यालाही या गीतात महत्त्वाचे स्थान आहे. याच संदर्भात 'मार्गी' व 'देशी' संगीताचा उल्लेख 'रत्नाकरा'तच आढळतो (त्याची चर्चा आपण पुढील लेखांकांमधून क्रमशः करणार आहोत.)

हिंदुस्थानी संगीतात घराण्याची संकल्पना रूढ आहे. वैदिक काळात 'घराणी' नव्हती; परंतु 'ऋषीकुले' होती. वैदिक काळात ऋषि-मुनी हे यज्ञप्रसंगी वेदऋचांचे गायन करीत. कोणी नवीन ऋचा तयार करून गाई. (ख्यालगायकीच्या परंपरेत नव्या बंदिशी तयार करणारे

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

गायक होते व आजही आहेत.) सामगान कुशल गायकांची घराणी होती. सामगायनाचा प्रसार करणाऱ्या ऋषींची नावे आढळतात. सामगायनाचा व्यवसाय करणारे लोक त्या काळात अस्तित्वात असल्याचे नमूद करण्यात आले आहे. सामगायन यज्ञ परंपरेशी वा यज्ञविधीशी निगडित होते. या परंपरेशी संबंध नसणाऱ्या गायकांचा वर्गही तत्कालीन समाजात अस्तित्वात होता. त्याचे वर्णन 'लौकिकगानाचा व्यवसाय करणारे लोक' असा करण्यात आला आहे. याचा अर्थ एकाच काळात दोन गानपरंपरा अस्तित्वात असाव्यात.

सामगायनाची काही ठळक वैशिष्ट्ये नोंदवून 'आवाज' संकल्पनेकडे वळता येईल. ही वैशिष्ट्ये श्रौताचार्य बापट व डॉ. तारळेकर यांच्या लेखनाच्या आधारेच सूत्र रूपाने मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

(१) ऋचा म्हणजे पादबद्ध अशी वाक्यरचना. ही वाक्यरचना विशिष्ट अशा चालींवर होत असून त्या चालींना वैदिक वाङ्‌मयात छंद म्हणतात. वैदिकोत्तर काळात त्याचेच नामकरण 'वृत्त' असे झाले. छंदोबद्ध ऋचांच्या आधारेच सामाचे गायन होत असे. भिन्न भिन्न छंदात साम गायिले जात असत. छंदोबद्ध अशा ऋचांच्या आधारे सामगायक ऋत्विज सामगान करीत. त्यांना 'छंदोग' म्हणत. छंद गाणारे ते छंदोग होत. सामगायनातील उत्कृष्ट गायनाला 'उग्दाते' म्हणत. सामगायन हा व्यवसाय होता. तो ऋषिमुनी करीत मात्र त्यांच्यात तीन प्रकार होते. व्यवसायानुसार त्यांना अनुक्रमे सामग, छांदोग व उग्दाते म्हणत. लौकिकगान वा स्वतंत्र गान करणाऱ्या वर्गाला 'गंधर्व' पदवीने संबोधिले जाई. 'गानरूप वार्णीना जो धारण करतो, तो गंधर्व' अशी गंधर्व शब्दाची व्याख्या आढळते. (आधुनिक काळात हिंदुस्थानी संगीतपरंपरेत काही गायकांना 'गंधर्व' पदवीने गौरविण्यात आले, ते किती सार्थ होते याची साक्ष पटते.) नारद व तुंबरु हे लौकिक गानविद्येत निपुण होते. सामगायनाचा आधार घेऊन 'नारदी शिक्षा' हा ग्रंथ निर्माण झाला व तो नारदाने लिहिला. गंधर्वांच्या गायनाला किंवा गांधर्वगायनविषयक वाङ्‌मयाचे वर्णन 'सामवेदाचा उपवेद' असे करण्यात आले. सामगायन हे श्रेष्ठ तर लौकिकगान हे दुय्यम, कनिष्ठ मानण्याची प्रथा होती. (धृपद श्रेष्ठ, ख्याल कमी दर्जाचा असे प्रारंभी मानले जाई. धृपदाची जागा ख्यालगायकीने घेतली तेव्हा ठुमरी, टप्पा, गझल, कजरी, होरी हे गानप्रकार दुय्यम मानले जाऊ लागले. ही शब्दप्रधान गायकी होती व आहे. आजही तीच ख्यालगायकीपेक्षा अधिक लोकप्रिय आहे. तिचे वर्णन 'उपशास्त्रीय संगीत' असे केले जाते. ठुमरीसारखे गायनप्रकार शृंगाररसाला प्राधान्य देणारे असून 'कोठीवरील गाणे' असेही त्याला संबोधण्यात आले.) तात्पर्य, प्रत्येक कालखंडात संगीतकलेत श्रेष्ठ–कनिष्ठत्वाचे वाद अस्तित्वात होते. उपशास्त्रीय संगीताचे वर्णन जुन्या परिभाषेचा आधार घेऊन 'लौकिकगान' असे करता येईल.

२) सामगायकांमध्ये पोटभेद आढळतात.

'गायत्री' व 'गाथी' असे ते पोटभेद होते. इंद्राची वा एखाद्या देवतेची स्तुती करणारे ते 'गायत्री' होत तर 'गाथा' हा एक सामभेद आहे. त्यांचे वर्णन 'गाथी' असे केले आहे. ज्या देवतेचे गुणगान केले जाते त्याचे नाव गाथेत येते. उदाहरणार्थ, ज्या ऋचीमध्ये यमदेवतेचे गुणगान केले जाते तिचे निर्देश 'यमगाथा' असे करीत. देवांचे स्तवन हे श्रेष्ठ गायन होय. मानवी व्यक्तीचे गुणगान करणारे गायन त्याज्य मानिले आहे.

तात्पर्य, सामगान वा लौकिकगान दोन्हीही देवदेवतांचे स्तवन करीत आणि मनुष्यमात्रांचे रंजन करीत.

३) सामगायन किंवा लौकिकगायन या दोन्हींमध्ये एकच स्वरसप्तक आढळते. लोकांमध्ये प्रचलित असलेली 'गानरूप वाणी' सात प्रकारांनी उच्चारली जाते. सामगायनात योजल्या जाणाऱ्या स्वरांची वैदिक नावे क्रुष्ट, प्रथम, द्वितीय, तृतीय, चतुर्थ, मंद्र (किंवा पंचम) आणि अतिस्वाय अशी आहेत. वैदिक नावांनी निर्देशित होणाऱ्या स्वरांची समानता किंवा नाते वेणूवादनातून निर्माण होणाऱ्या स्वरांशी



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असते. सामस्वर व वेणूमधील स्वर पुढे दिले आहेत. १) प्रथम-मध्यम २) द्वितीय-गांधार ३) तृतीय-ऋषभ ४) चतुर्थ-षड्ज ५) पंचम-धैवत ६) षष्ठ-निषाद ७) सप्तम-पंचम सप्तमस्वर म्हणजे पंचम म्हणजेच क्रुष्ट स्वर होय असे टीकाकार म्हणतात.

४) सामात पाच 'भक्ती' किंवा 'भाग' आहेत. त्याच्या गायनासंदर्भात दिलेल्या सूचना या आजच्या गायनकलेलाही लागू पडतात. त्या प्रामुख्याने श्वासाशी निगडित आहेत. या पाच 'भक्ती' अंशा : १) प्रस्ताव २) उद्गीय ३) प्रतिहार ४) उपद्रव ५) निधन. प्रत्येक भक्तीचे विभाग 'पर्व' म्हणून ओळखले जातात. 'पर्वा'नंतर एक उभी रेष तर 'भक्ती'नंतर दोन उभ्या रेषा दर्शविण्याची पद्धत ग्रंथात आढळते. एक भक्ती साधारणता एका श्वासात म्हणावी असे म्हटले आहे. (आज आपण 'दमसास' असे वर्णन करतो. भीमसेन जोशी किंवा पंडित मल्लिकार्जुन मन्सूर यांच्या गायनक्रियेतील दमसास वा श्वासाचे नियंत्रण आठवून पाहावे.) पाच भक्तींपैकी पहिल्या चार भक्ती अनुक्रमे प्रस्तोता, उद्गाता, प्रतिहर्ता व उद्गाता यांनी म्हणावयाच्या आहेत, तर 'निधन' सर्व तिन्ही सामगायकांनी म्हणावयाचे असते. निधन म्हणजे सामाची समाप्ती होय.

५) वर विवेचन केलेल्या सामस्वर व वेणूस्वर यांच्या आधारे स्वरसप्तकाचा ताळमेळ लावण्याचा प्रयत्न केला जातो. सामगायकांचे प्राचीन स्वरसप्तक हे 'म, ग, रे, सा, ध, नि, प' या अवरोहक्रम बनणाऱ्या अर्वाचीन अगर प्रचलित गायनात वापरल्या जाणाऱ्या स्वरसप्तकाबरहुकूम आहे. प्राचीन सामगायनातील सप्तस्वर व अर्वाचीन गायनातील सप्तस्वर यांचे स्वरूप तत्त्वतः एकच असले तरी त्यांची नावे व त्यांचे क्रम यात फरक आढळतो.

या स्वरसप्तकाबद्दल व त्यातील क्रमाबद्दल अभ्यासकांनी व भाष्यकारांनी विविध प्रश्न उपस्थित केले आहेत. त्या चर्चेत आपण अधिक जावयाचे कारण नाही कारण सांगीतिक संकल्पना, आकलन-आस्वाद प्रक्रिया, गानप्रकारांचा रूपबंध आणि सांगीतिक समीक्षा यांचाच विचार या लेखमालेत प्रामुख्याने करण्याचे योजिले आहे. सामाचे स्वरसप्तक व त्याची स्वरस्थाने, त्यांचे क्रम व त्यांची नावे याबद्दल उलटसुलट सर्व प्रकारची चर्चा गेल्या शंभरएक वर्षात झाली आहे.

६) गांधर्व व प्रचलित संगीताच्या चर्चेकडेच आपणास वळावयाचे आहे. 'हिंदुस्थानी संगीत' या विषयाकडे वळण्यापूर्वी काही संकल्पना स्पष्ट करून घेणे अगत्याचे आहे. रागचर्चेत फारसे न शिरतादेखील रागसंकल्पना राग व रससंबंध व राग व समयसंबंध आपण पुढील लेखात पाहणार आहोत. राग म्हणजे नेमके काय याची व्याख्या करण्यापूर्वी जाता-जाता रागप्रकारांचा निर्देश करीत आहे. रागाचे तीन प्रकार होत. १) षाडव २) औडव आणि ३) संपूर्ण. हे तीन प्रमुख प्रकार असून त्यात शुद्ध, मिश्र, जोड व संकीर्ण अशा रागभेदांचा समावेश आहे. सहा स्वरांनी आळविण्यात येणाऱ्या रागांचे वर्णन 'षाडव' या प्रकारात करतात; तर पाच स्वरांच्या आधारे गायिल्या जाणाऱ्या रागांना 'ओडव' किंवा 'औडुव' म्हणतात. सातही स्वर ज्या रागांत आहेत त्या रागांना 'संपूर्ण राग' म्हटले जाते. रागसंकल्पनेमागे 'थाट' पद्धतीचाही संबंध आहे. अर्थात त्याची चर्चाही रागसंकल्पनांविषयीच्या लेखात येईलच! तसेच श्रुती, ग्राम आणि मूच्छर्ता म्हणजे काय त्याचाही तेथेच संक्षेपाने विचार करता येईल.

नादाच्या उच्च-नीचतेतून श्रुती व स्वर उत्पन्न होतात. नादाचाच संबंध आवाजाशी आहे आवाज कसा निर्माण होतो ते शरीरविज्ञानाच्या आधारे संगीततज्ज्ञ, भाषाशास्त्राचे अभ्यासक व आवाज-साधना-शास्त्राचे जाणकार यांनी दाखविले आहे. त्याचा शरीरविज्ञानाशी (ॲनाटॉमी) थेट संबंध आहे. आवाजाच्या जाती, धर्म आणि लगाव यांचे पुढे विश्लेषण केले आहे. मानवी आवाज ही नैसर्गिक बाब असली तरी तो निर्माण होण्याची एक प्रक्रिया आहे. ही प्रक्रिया आवाजसाधनेने संस्कारित करता येते. पाश्चात्त्यांकडून 'आवाज साधनाशास्त्र' (व्हॉइसकल्चर) हे एक शास्त्र म्हणून







राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपण स्वीकारले असले, तरी त्यापूर्वी स्वरांच्या मेहनतीसाठी पूर्वापार पद्धतीने काही सांगीतिक व्यायाम सांगितले जात. आकार, इकार, उकार, पकार या माध्यमातून स्वर लावण्याचे शिक्षण किंवा खर्जातील आवाजसाधना आजही रूढ आहे. तिचे महत्त्व कमी झालेले नाही. संगीतशास्त्राचे गाढे अभ्यासक व पंडित विष्णू दिगंबर पलुस्कर यांचे शिष्य प्रोफेसर बा. र. देवधर यांनी 'आवाजसाधनाशास्त्र' नावाचे पुस्तक लिहिले आहे. त्यांचेच शिष्य व संगीतशास्त्राच्या सौंदर्यात्मक बाजूंची उकल करणारे गायनाचार्य डॉ. अशोक दामोदर रानडे यांनीही आवाज जोपासनेविषयी लिहिले आहे. गद्य नट, सभेतील वक्ता व मैफलीतील गायक अशा तिघांनाही आवाजसाधनेचे शास्त्र कसे उपयुक्त ठरू शकते ते डॉ. रानडे यांनी सांगितले आहे. 'भाषणरंग : व्यासपीठ व रंगपीठ' हे डॉ. रानडे यांचे १९९५ सालचे पुस्तक आहे तर त्यांचे गुरू बा. र. देवधर यांचे वर निर्देशित पुस्तक १९७९ सालचे आहे. प्रा. देवधर यांना डॉ. जिओव्हानो स्क्रिंझी (१८६४-१९३५) यांचे आवाजसाधनाशास्त्र या विषयात मार्गदर्शन लाभले. प्रा. स्क्रिंझी हे पाश्चात्त्य संगीतातील रचनाकार (कंपोजर) कलाकार (आर्टिस्ट) व संगीतसमीक्षक होते. त्यांनी भारतीय कंठसंगीताचा व वाद्यसंगीताचा सखोल अभ्यास केला होता. हिंदुस्थानी संगीतातील गायकांच्या गायनक्रियेचे (म्हणजे शारीरिक हालचाली व हावभावांसह) सूक्ष्मतेने अवलोकन करून त्यातील गुणदोषांचे विवेचन केले. त्यांच्या प्रभावामुळेच कै. देवधर आवाज जोपासना शास्त्राकडे वळले. त्यांच्या व प्रो. स्क्रिंझी यांच्या विवेचनाचे सार श्वसनक्रियेत व श्वासासाठी होणाऱ्या हालचालींमध्ये दडले आहे ते अगदी सूत्ररूपाने असे :

देवधर म्हणतात त्याप्रमाणे, ध्वनीच्या उत्पत्तीसाठी शरीरातील ज्या स्नायूंचा उपयोग मुख्यत्वे करून होतो ते तीन विभागातील आहेत ते असे : १) श्वसनक्रिया (Breathing) २) स्वरतंतूंची (Vocal Chord) आंदोलनक्रिया ३) जिभेमागील घशाच्या पोकळीतील (Lanyngeal Pharynx) सहकंपन-क्रिया.

आपण प्रथम जेव्हा श्वास आत घेतो तेव्हा तो नाकावाटे फुफ्फुसात जातो. फुफ्फुस त्या हवेनं फुगतात. त्यानंतर फुफ्फुसांच्या खाली-पण पोटाच्या वर जो एक पातळ आडवा पडदा (Diaphragm) असतो तोही थोडाफार खाली दबला जातो. (इथे श्वास आत घेण्याची क्रिया पूर्ण होते.) आणि उच्छ्वासाची-हवा वरती येत राहण्याची -क्रिया सुरू होते. प्रथम खाली दाबला गेलेला तो पडदा पूर्वस्थळी म्हणजे वर येतो. (त्यानंतर हवा फुफ्फुसातून वर जाऊ लागते) उच्छ्वास घशातील स्वरतंतूंना आंदोलित करून (मुखावाटे) बाहेर जाऊ लागतो. आणि त्या स्वरतंतूच्या कंपनामुळे ध्वनीची निर्मिती होते. ध्वनी नुसताच थेट बाहेर न पडता, जिभेमागील पोकळीत योग्य प्रकारे फिरून जर बाहेर पडेल तर त्याला एक प्रकारचा घुमारा प्राप्त होईल.

प्रत्यक्ष आवाजाची निर्मिती करणारे फुफ्फुस, डायाफ्राम व स्वरतंतू हे स्नायूगट होत. याखेरीज ओटीपोटाचे स्नायू, छातीच्या पुढील भागातील स्नायू तसेच खांदा व गळा यातील स्नायू-असे सर्व स्नायू शिथिल होण्याची गरज आहे. प्रा. देवधर यांच्या आवाजसाधना शास्त्रातील त्रुटी पंडित शामराव कुलकर्णी ऊर्फ धर्मव्रत यांनी आपल्या 'भारतीय आवाजसाधना शास्त्र : सिद्धान्त आणि साधना' या पुस्तकात विस्ताराने विवेचिल्या आहेत. त्यांनी संगीताच्या शास्त्राबरोबरच योगसाधनेचा सखोल अभ्यास केला आहे. त्यांच्या म्हणण्यानुसार प्रा. देवधर यांचे आवाजसाधनाशास्त्र हे एक थोतांड आहे. त्यामुळे अनेकांचे 'बरे' असणारे आवाज बिघडले. त्यांचे याबाबतचे म्हणणे पुढे त्यांच्याच वरील ग्रंथातून उद्धृत केले आहे ते असे :

"वस्तुतः श्वासच नव्हे, तर श्वास आणि वाणी ही दोन्हीही नाभिकमलापासूनच उगम पावत असतात असं भारतीय मनीषींचं स्वानुभवाचं सांगणं आहे. परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी या चार प्रकाराच्या वाणी


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असून त्या अनुक्रमे नाभी, हृदय, कंठ आणि मुख या चार ठिकाणी वास करीत असतात; असं शास्त्रकारांनी म्हटलं आहे. श्वसनाचाही मार्ग बरोबरं असाच आहे हे लक्षात ठेवलं पाहिजे. अर्थात् नादब्रह्माचा म्हणजे संगीताचा मार्गही तोच असणं स्वाभाविक आहे; हे पुन्हा निराळं सांगायला का हवं?"

"हे मार्ग लक्षात घेऊन जुन्या गवैय्यांनी सर्व स्त्री-पुरुष गायक-गायिकांना 'मंद्रसाधना' किंवा खर्जसाधना ही आवाजसाधनेसाठी एक आवश्यक गोष्ट म्हणून बजावून सांगितली आहे. प्रत्यक्ष स्वरनिर्मिती ही गळ्यातील स्वरयंत्रातून होते हे जरी खरं असलं तरी त्या स्वराला श्वासाची जी ताकद पोहोचते ती कंठाच्याही खाली असणाऱ्या हृदय आणि नाभी या दोन केंद्रांपासून पोहोचते यात काही शंका नाही. मंद्र स्वराचं उत्पत्तीस्थान हृदय आहे अशा अर्थाचा एक श्लोकही गवई लोकांच्या म्हणण्यात नेहमी येतो." (पृष्ठ ७३)

'आवाजसाधनाशास्त्र' म्हणजे 'व्हॉइसकल्चर' चा पुरस्कार किंवा समर्थन करणारे आधुनिक संगीतशास्त्री मंद्रसाधनेबद्दल नेहमीच नाक मुरडीत आले आहेत. स्वरासाठी 'मंद्रसाधना' हीच वैज्ञानिक आहे असे, श्री. कुलकर्णी सांगतात.

आवाजाची घनता, स्वराची तीव्रता आणि त्याचा शरीरविज्ञान आणि आवाजसाधनाशास्त्राशी असणारा संबंध याचा पाश्चात्त्य देशातील संगीतकार, संगीतसमीक्षक यांनी सखोल अभ्यास केला आहे. भारतीय संगीताच्या संदर्भात तसा अभ्यास जुन्या-नव्या मतांचा 'मेळ' घालून करता येणे अशक्य नाही.

'आवाज' ही संकल्पना उलगडताना केवळ त्याचे वर्गीकरण उपयोगाचे नाही; त्याची भारतीय संगीताच्या संदर्भातील उदाहरणे देणे आवश्यक आहे. संकल्पना मांडताना ही उदाहरणे कदाचित अस्थानी वाटतील परंतु संगीतासारख्या अमूर्त कलेबद्दल केवळ सैद्धान्तिक परिभाषेत वा औपपत्तिक भाषेत लिहिणे-बोलणे अवघड आहे. अर्थात इथे एक मुद्दा विरोधक उभा करतील की, अमुक एका गवयाच्या व गायिकेच्या आवाजाचे तुम्ही केलेले वर्णन हे तुमचे मत आहे किंबहुना त्या त्या आवाजाची तुमच्या मनावरील मोहिनी तुम्ही विशेषणे लावून स्पष्ट करीत आहात. ही टीका मान्य करूनसुद्धा पुन्हा गेल्या शतकातील काही गायक-गायिकांची उदाहरणे केवळ आवाजाच्या जाती, धर्म आणि लगाव स्पष्ट करण्यापुरती दिली आहेत.

**आवाज आणि आवाजाचे प्रकार**

आवाजाची निर्मिती कशी होते याची स्थूल कल्पना वरील परिच्छेदात दिली आहे. आवाज हे एकदा संगीताचे म्हणजेच हिंदुस्थानी शास्त्रीय संगीताच्या संदर्भात 'कंठ संगीता'चे साधन मानल्यानंतर साऱ्या संगीताची भिस्त त्या आवाजावरच ठेवावी लागते. हा आवाज निसर्गत:च चांगला किंवा वाईट असू शकतो; म्हणजे सुरेल किंवा बेसूर अशा दोनच प्रकारांत त्याची विभागणी वा वर्गवारी होऊ शकते. आनुवंशिकतेतून माणसाचा चेहरा, रंग, रूप शरीराची ठेवण अशा अनेक गोष्टी आपातत: येत असतात. कधी त्या पित्याकडून येतात तर कधी मातुल घराण्यातून येताना आढळतात. आवाज हाही निसर्गत:च येतो. वेगवेगळ्या वयात त्याचे स्वरूप बदलते. मनुष्याच्या जीवनात वयोमानानुसार, त्या त्या टप्प्याला बदल होतात; आणि ते स्वाभविकही आहे. एखाद्याचा जन्मत:च आवाज अत्यंत सुरेल असू शकतो, मात्र असा माणूस गायक होतोच किंवा होईलच असे नाही; कारण त्या आवाजावर मेहनत घ्यावी लागते. ही मेहनत म्हणजे एक प्रकारे स्वराची साधना असते. त्यासाठी आवाजाच्या प्रकारांप्रमाणे त्याच्या जाती आणि त्याचे धर्मही लक्षात घ्यावे लागतात. आवाजाचे प्रकार शेकडो असू शकतात. हा आवाज साध्या गद्य बोलण्याचाही असू शकतो. इथे आपण संगीतातल्या आवाजाचा विचार करीत आहोत. एखाद्याचा बोलण्यातील आवाज आणि गायनातील आवाज भिन्न असू शकतो आणि ते स्वाभाविकही आहे. गायकाला आपल्या आवाजाची जशी साधना करावी लागते तशी ती रंगभूमीवरील नटालाही घ्यावी लागते. याचा अर्थ प्रत्येकाच्या आवाजाचा मूळ धर्म साधनेतून बदलता येऊ





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शकतो. 'स्वरसाधना' हा शब्द त्यातूनच आला आहे.

सामान्य व्यवहारातील आकारमानाची विशेषणे वापरूनच आपण आवाजांची वर्गवारी किंवा जातवारी करू शकतो. उदाहरणच द्यावयाचे तर ही आवाजासाठी वापरलेली काही विशेषणे पाहा. १) मोकळा आवाज २) जड आवाज ३) हलका आवाज ४) सानुनासिक आवाज ५) उंच आवाज ६) बारीक आवाज ७) किनरा आवाज ८) बालसुलभ आवाज ९) बसका आवाज १०) ढाला आवाज ११) घुमारेदार आवाज १२) पातळ आवाज १३) लवचिक आवाज १४) नितळ आवाज १५) पल्लेदार आवाज इत्यादी.

अशी विशेषणे वापरून आवाजाच्या प्रकारांचे वा जातींचे वर्णन करता येईल. विशिष्ट व्यक्तीच्या गळ्यातून विशिष्ट तऱ्हेचाच आवाज का आणि कसा निघतो याबद्दलच्या शास्त्रीय अभ्यासात फारसे न शिरता यातील जाती कशाच्या आधारे तयार होतात ते पाहाणे अधिक उद्बोधक ठरेल. 'प्रत्येकाच्या आवाजाचा एक धर्म असतो' असे आपण म्हणतो तेव्हा आवाजाच हा 'धर्म' म्हणजेच त्या त्या आवाजाचे व्यवच्छेदक लक्षण असते त्यामुळेच तो तो गायक वा गायिका ओळखली जाते. एरवी सर्व संगीत सारखेच वाटले असते. (आपण वृंदगान (कोरस) ऐकतो तेव्हा वर वर्णन केलेल्या वेगवेगळ्या जातीच्या आवाजांतून निर्माण होणाऱ्या स्वरांचा एक 'मेळ' तयार करावा लागतो.)

आवाजाचे लगाव कसे तयार होतात? आवाजाची घनता, आकारमान, आवाजाचा मूळ धर्म यावर होणाऱ्या संस्करणातूनच स्वरसिद्धी होते. आवाज लावण्याच्या पद्धतीतूनच त्या त्या गायकीचे स्वतंत्रपण किंवा शैली सिद्ध होते. या शैलीचेच आपण 'घराणे' असे नामाभिदान केले आहे. ख्यालगायकीत किंवा त्याहीपूर्वी प्रचलित असणाऱ्या धृपदगायकीतही आवाजाचे लगाव महत्त्वाचे होते आणि आजही आहेत. आवाजाच्या घनतेप्रमाणे त्याच्या पोतालाही महत्त्व असते. आवाजाचा पोत ओळखायचा कसा? काही अभ्यासकांनी आवाजाच्या जाती ओळखण्याची खूण किंवा आवाजाची जात म्हणजेच 'पोत' असे म्हटले आहे. ध्वनी हे मूलद्रव्य मानल्यानंतर 'आवाज' या साधनातून त्याचे प्रगटीकरण कसे होते ते आपल्याला उदाहरणांमधून समजावून घेता येईल. आवाजाची मूळ जात (किंवा पोत) काहीही असली तरी त्यावर होणारे संस्करण महत्त्वाचे असते. त्यातही अनुकरण ही बाब स्वाभाविकपणे येते. हिंदुस्थानी संगीतात तर हे फार सहजतेने आणि अपरिहार्यपणे घडते; कारण गुरुमुखी अध्यापन पद्धती होय. गुरु-शिष्य परंपरेत हे जाणता-अजाणता घडतच असते. कोणत्याही घराण्यात, परंपरेत किंवा शैलीत 'गुरूसारखे गाणे' या गोष्टीला महत्त्व होते आणि आहे. आपल्या स्वतःच्या आवाजाचा मूळ धर्म (स्वभाव) लक्षात घेऊन गुरूचे म्हणजे त्याच्या आवाजधर्माचे अनुकरण किंवा अनुसरण समजू शकतो. एखादी गायकी 'फॉलो' करणे आणि एखादी गायकी 'इमिटेट' करणे यातला फरक खरे तर सूक्ष्म आहे. हा फरक हिंदुस्थानी संगीतातल्या फार थोड्याजणांना उमगला. गुरूच्या आवाजाबरहुकूम आपल्या गळ्यातून आवाज काढणे ही इतिश्री किंवा कृतार्थता आजही मानली जाते. एकूणच भारतीय परंपरेत अनुसरण मागे पडून अनुकरणच अधिक प्रभावीपणे पुढे येते; मग ते क्षेत्र राजकीय, सामाजिक, धार्मिक विचारांचे असो वा ललित व प्रयोगशरण कलांचे! अनुकरण ही निसर्गसुलभ वृत्ती आहे, हे जरी खरे असले तरी हे अनुकरण किती व कसे करावयाचे याचे भान नसले तर गायक आपला मूळ आवाजही हरवून बसतो. आवाजातील 'दोष' हेच 'गुण' म्हणून मिरवू लागतात.

आवाजाच्या वेगवेगळ्या जातींचे 'संगीत-रत्नाकर' या ग्रंथात केलेले विवेचन हे आयुर्वेदिय चिकित्सा पद्धतीवर आधारित आहे. वात-कफ-पित्त अशा तीन प्रकारात आयुर्वेदीय चिकित्सा केली जाते, तोच आधार संगीतरत्नाकरात याबद्दलचे वर्णन पुढीलप्रकारे करण्यात आले आहे :

१. कफात्मक प्रकृतीच्या माणसाचा आवाज तेलाच्या धारेप्रमाणे सलग, मध्ये न तुटणारा, गोड व



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कोमल असतो. अशा आवाजाचे वर्णन 'खाहुल' म्हणतात. हाच आवाज मंद्र व मध्य सप्तकात जोरदार व गंभीर असा असला म्हणजे त्याला 'आडिलृ' म्हणतात.

२. पित्तामक प्रकृतीच्या माणसाचा आवाज तिन्ही म्हणजे मंद्र, मध्य व तार सप्तकांत गंभीर व भरीव असतो. ग्रंथात त्याचे वर्णन 'नाराट' असे केले आहे.

३. वात प्रकृतीच्या माणसाचा आवाज निस्तेज, कर्कश व उंच असतो. त्याचे वर्णन 'बोम्बक' शब्दात केले जाते.

या तिन्ही प्रकारच्या जातींच्या आवाजातून एक मिश्रण तयार होते; त्याचे वर्णन 'मिश्रक' असे केले जाते. आवाजाचे विविध प्रकार वर वर्णिले आहेत. 'संगीतरत्नाकरा'त असे तीस प्रकार सांगितले आहेत. मात्र मूळ आवाजावर होणाऱ्या संस्कारातून तयार होणाऱ्या आवाजाविषयी या ग्रंथात निर्देश आढळत नाही. या संदर्भातील विवेचन आधुनिक काळातील आवाजसाधना शास्त्राच्या किंवा संगीतशास्त्राच्या अभ्यासकांना मान्य असेलच असे नाही.

आवाजाचे वर्गीकरण स्त्री-पुरुष भेदाच्या आधारेही केले जाते. वात-पित्त-कफ या आधारे निदान केल्यावर त्या त्या व्यक्तीच्या आवाजाची व्यवच्छेदक लक्षणे आयुर्वेदाने सांगितली आहेत. मात्र आवाजातील उच्च-नीचतेला अनुसरून एक वर्गीकरण केले जाते; अर्थात ही वर्गीकरण पद्धती हिंदुस्थानी संगीतातील नाही; ती पाश्चात्त्य संगीतातील आहे. त्या पद्धतीनुसार मानवी आवाजात सहा दर्जे (मजले) मानले जातात. पुरुषांचे दर्जे :- १) बास (नीच), २) बॅरिटोन (मध्यम), ३) टेनर (उंच). स्त्रियांचे दर्जे :-१) कॉन्ट्रॅल्टो (उच्चतर वा अधिक उंच) २) मेझ्झो सोप्रानो (बराच उंच) ३) सोप्रानो (अति उंच).

स्त्रियांचे आवाज उंच वा अतिउंच या प्रकारात मोडतात. जुन्या पिढीतील किराना घराण्याच्या गायिका रोशन आरा बेगम यांचा आवाज असा होता. नव्या पिढीतील गायिका बेगम परवीन सुल्ताना यांचाही आवाज याच पठडीत मोडतो. केसरबाई केरकर, मोगूबाई कुर्डीकर, लक्ष्मीबाई जाधव, धोंडूताई कुलकर्णी, किशोरी आमोणकर यांच्या आवाजाची 'रेंज' अशीच मोठी आहे. आणखीही काही नावांची भर त्यात घालता येईल.

आवाजाच्या वेगवेगळ्या जाती (पोत) व लगाव यांचे केवळ शास्त्राधारे वर्णन करणे अवघड आहे, कारण आपण 'ध्वनी' या अदृश्य, अमूर्त संकल्पनेची चर्चा करीत आहोत. 'हा म्हणजे हा' असे ठोस, थेट न म्हणता अमुक एक आवाज म्हणजे 'यासारखा' असा संदर्भ सतत दिला जातो. किराना, जयपूर, आग्रा व ग्वाल्हेर ही हिंदुस्थानी संगीतातील प्रमुख घराणी आहेत. 'आवाज लावण्या'च्या पद्धतीनुसार त्यांचे वर्गीकरण झाले असले तरी एकाच घराण्यातील तीन पिढ्यांतील गायक-गायिकांच्या आवाजाचे धर्म वेगवेगळे राहिले आहेत. ते कसे ते उदाहरणे देऊनच पाहावयास हवे.

कि[illegible] [illegible]ण्याचे अध्वर्यू खाँसाहेब अब्दुलकरीम [illegible] 'विश्रब्ध शारदा' ग्रंथाच्या दुसऱ्या खंडातील [illegible] पत्रव्यवहाराला (पृष्ठ १९४) टीप लिहिताना डॉ. श[illegible]चंद्र [illegible]ष्णू गोखले यांनी जे म्हटले आहे ते असे : त्यांचा [illegible] आवाज होता तोच बारा महिन्यांचा आठ प्रहरांचा बोलता आवाज होता. गळा खुल्ला [illegible] धरून छातीच्या पडद्यापासून वर दाब देत देत खाल [illegible] कंठातून आवाज काढून तो पोकळ्या घुमतील असा दातांकडे फेका अशी त्यांची शिकवण असे; तारसप्तकाची फिरत चालू असताना; भर थिएटरमध्येही थांबून, 'नह बेंबीसे निकलते है गलेसे नही, देखो' असे त्यांनी केकवार सांगितले होते.

अब्दुलकरीम खाँचे शिष्य कै. रामभाऊ कुंदगोळकर ऊर्फ सवाई गंधर्व यांचा आवाज सुरेल होता, परंतु तो कष्टसाध्य होता. 'आवाज तापणे' अशी एक प्रक्रिया प्रत्यक्ष मैफलीत गाणाऱ्या कलावंतांच्या नित्य परिचयाची असते. सवाई गंधर्व यांची गणना अशा मेहनतीने कमावलेल्या आवाजाच्या प्रकारात करावी लागेल. त्यांचे शिष्य व ख्यातनाम गायक भीमसेन यांच्या आवाजाचे वर्णन 'किराना गायकीचा मानदंड'









राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

(स्वराधिराज) या लेखात प्रस्तुत लेखकाने केले आहे ते असे "गायकी स्वरप्रधान असली तरी आवाज लावण्याची या घराण्याची पद्धत अन्य घराण्यांपेक्षा काहीशी वेगळी आहे. ती गळ्यावर ताण देणारी व थोडी कृत्रिम आहे, असं टीकाकारांना वाटतं. हा उणेपणा, तंत्रदोष असला तरी तिचं नातं 'गोबरहारी' या 'वाणी'शी आहे; कारण आर्तता आणि भक्तिभाव हे तर या वाणीचे विशेष आहेत. स्वराची आस अखंड टिकणं आणि एका स्वरातून दुसरा स्वर निर्माण होणे हे तंतअंगाचे (वाद्यातील) विशेष मानले जातात. भीमसेन यांच्या गायकीत त्याचा प्रत्यय येतो."

आग्रा घराण्याचे गायक खाँसाहेब फैय्याजखाँ यांच्या आवाजाचे वर्णन प्रा. बा. र. देवधर यांनी 'थोर संगीतकार' या ग्रंथात (पृष्ठ १७५) पुढीलप्रमाणे केले आहे, "पूर्वीच्या काळी अशी समजूत असे की, गवयाने निदान हार्मोनियमच्या चवथ्या पट्टीत तरी गायिले पाहिजे. कित्येक गवयांच्या आवाजाची मर्यादा ढाल्या सुराची असताना सुद्धा ते उंच सुरातच मेहनत करीत; व शेवटी अस्वाभाविक ताणाताणीमुळे, आवाजास इजा पोचत असे.... खाँसाहेबांनी आपल्या आवाजाचा स्वभावधर्म ओळखून, आवाजाच्या स्वाभाविक मर्यादेतच तो कसला होता. त्यांचा स्वर काळी पहिली अगर पांढरी पहिली इतका ढाला असला तरी तो आवाजाच्या स्वाभाविक मर्यादेतच कसला गेल्यामुळे भरदार, भारदस्त व जव्हारीदार बनला होता."

ग्वाल्हेर घराण्याची गायकी ज्यांनी देशात प्रस्थापित केली त्या पंडित विष्णू दिगंबर पलुस्कर यांच्या गायकीचे वर्णन करताना प्रा. देवधर यांनी त्यांच्या आवाजाचे विश्लेषणही केले आहे. वर निर्देशित ग्रंथातील एका लेखात (पृष्ठ १२६) प्रा. देवधर म्हणतात, "पंडितजींचा आवाज मोठा, घुमारदार व कसलेला पण गोड असे. सुरेलपणाकडे त्यांचे फार लक्ष असे. अत्यंत कष्ट करून त्यांनी तान साध्य केल्यामुळे ती फार वजनदार व प्रभावी होती. त्यांचा आवाज एवढा मोठा होता की, साथीला बसलेल्या चार शिष्यांनी लावलेला तार षड्ज पंडितजींच्या आवाजापुढे एकदम फिका पडे."

जयपूर-अत्रौली घराण्याच्या गायिका सूरश्री केसरबाई केरकर यांचा आवाज, त्यांचा दमसास, त्यांची तान, आकारयुक्त आलापी हे सर्वच मेहनतीने साध्य केलेले परंतु विलक्षण सुरेल होते. 'एकलव्य' या टोपणनावाने कै. केशवराव भोळे लिहीत असत. संगीताचे मर्मज्ञ समीक्षक म्हणून ते ख्यात होते. केसरबाई व मोगूबाई कुर्डीकर यांचे टीकाकार म्हणून ते ज्ञात होते. मात्र त्यांनी केसरबाईंच्या आवाजाचे यथोचित वर्णन कसे केले आहे ते पाहा.

"केसरबाईंचा आवाज गोड व सुरेल आहे. तो हिराबाईंपेक्षा गोडीला कमी असला तरी मोठा आहे. उंची चांगली आहे. मेहनतीमुळे त्याला बांधेसूदपणा व गोलाई आलेली आहे. त्या गोहरजानप्रमाणे तिन्ही सप्तकातील स्वर सहज, सारख्या मापाचे व रुंदीचे लावतात."

तात्पर्य :- आवाजाच्या जाती, धर्म आणि त्याचे लगाव वरील उदाहरणांवरून पुरेसे स्पष्ट होतील; असे वाटते.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# श्रीकृष्णाने वसुदेवास सांगितलेला भारतीय युद्धाचा वृत्तांत

प्रा० म० अ० मेहेंदळे

वरील शीर्षकाचा माझा लेख 'नवभारत'च्या फेब्रुवारी २००८ च्या अंकात प्रसिद्ध झाला. त्यावर श्री. विश्वनाथ खैरे यांची प्रतिक्रिया 'नवभारत'च्या जुलैच्या अंकात प्रसिद्ध झाली. भारतीय युद्धाच्या संजयकृत वर्णनात आणि श्रीकृष्णाच्या वर्णनात बऱ्याच विसंगती आढळत असल्याचे मी निदर्शनास आणले. 'कृष्णाचे वर्णन अविश्वासार्ह, अतिशयोक्त, पक्षपाती असल्याचे मी म्हटले. खैरे यांना माझे मत सर्वतोपरी अमान्य आहे. त्यांचे मत मलाही अमान्य आहे. प्रस्तुत लेखात त्यांच्या परीक्षणातील सर्व तपशीलांवर लिहिण्याचा माझा विचार नाही. फक्त माझ्या पहिल्या मुद्द्यावर त्यांचे जे विचार आहेत त्यांचा परामर्श मी घेणार आहे. तेवढ्या एका उदाहरणावरून खैरे यांच्या आक्षेपांचे स्वरूप वाचकांच्या लक्षात येईल.

संजयाच्या वर्णनात साऱ्या युद्धात कौरवांचे भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य आणि अखेर अश्वत्थामा असे पाच सेनापती झाले असे मी म्हटले आणि शेवटी कंसात (९.६३.३६-४०) असा संदर्भ दिला. खैरे यांचा यावर आक्षेप असा आहे की तो संदर्भ फक्त अश्वत्थाम्यापुरता मर्यादित आहे. पहिल्या चार सेनापतींना तो लागू नाही. पहिल्या चार सेनापतींचे संदर्भ मी दिले नाहीत, कारण त्यांचे सेनापतित्व सर्वश्रुत आहे. शेवटचा सेनापती अश्वत्थामा हे सर्वसामान्य वाचकास माहीत नसते असे समजून त्याच्यापुरता संदर्भ मी दिला. त्यावेळी तो संदर्भ आधीच्या सेनापतींनाही लागू आहे असे कुणाला वाटेल अशी मला चुकून कल्पना आली नाही.

पांडवांचा सेनापती धृष्टद्युम्न अखेरपर्यंत चालू राहिला असे म्हटल्यावर संदर्भाची तशी आवश्यकता नव्हती, पण मी एक दिला. धृष्टद्युम्नवधाचे वृत्त अश्वत्थाम्याच्या तोंडून ऐकल्यावर दुर्योधन त्याचा उल्लेख 'क्षुद्र सेनापती' असा करतो हे एका तळटीपेत सांगितले. खैरे यांचा आक्षेप असा आहे, की दुर्योधनाने तसे म्हटल्यामुळे धृष्टद्युम्न पांडवांचा अखेरपर्यंत सेनापती होता हे सिद्ध होत नाही, हे दर्शविण्यासाठी खैरे नमूद करतात की "याच अध्यायातल्या पहिल्याच श्लोकात "अकरा चमूंचा धनी मारला जाऊन पडला आहे (एकादशचमूभर्ता शेते दुर्योधनो हतः।। १०.९.१)" असे म्हटले असले तरी त्याक्षणी दुर्योधनाकडे अकरा चमू नव्हत्या हे उघड आहे. खैरे यांच्या वाक्यातल्या दोन किरकोळ चुकांचा प्रथम उल्लेख करतो. एकतर, वरील वचन अध्यायाच्या 'पहिल्याच' श्लोकात नसून दहाव्या श्लोकात आहे. नुसता संदर्भ देण्याखेरीज खैरे यांनी 'पहिलाच श्लोक' असे म्हटले नसते तर मी हा एक मुद्रणदोष मानला असता (१०.९.१० ऐवजी १०.९.१). दुसरे असे की, 'दुर्योधन मारला जाऊन पडला आहे' असे म्हणणे योग्य नाही. दुर्योधन त्याक्षणी गतप्राण झाला नव्हता, आसन्नमरण होता (किंचित्प्राणं नराधिपम् १०.९.२). शिबिरातल्या संहाराची आनंद देणारी बातमी अश्वत्थाम्याच्या तोंडून ऐकल्यावर दुर्योधन त्याला म्हणतो "पांडवांचा क्षुद्र सेनापती (धृष्टद्युम्नाचे तो नावही उच्चारत नाही) आणि शिखण्डी जर मेले असतील तर मी मला इंद्रासमान मानतो" आणि प्राण सोडतो (प्राणानुदसृजद् वीरः १०.९.५५). या क्षणी 'दुर्योधन मेला' असे म्हणता येईल. 'हन्' धातूला दोन अर्थ आहेत 'प्रहार करणे, मारणे (to strike down, to slay). कृपाचार्यांच्या वाक्यात (शेते दुर्योधनो हतः') 'हतः'ला 'प्रहार झालेला, तडाखा बसलेला' हा अर्थ आहे.

दुर्योधनाच्या वाक्यातल्या 'क्षुद्रः सेनापतिः' या शब्दांनी धृष्टद्युम्न पांडवांचा अखेरपर्यंत सेनापती होता हे सिद्ध होत नाही हे खैरे यांचे म्हणणे क्षणभर मान्य केले तरी तो केव्हा तरी पांडवांचा सेनापती होता एवढे तरी सिद्ध होते की नाही? पण पांडवांचा तो केव्हाही सेनापती



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नव्हता, सेनापती भीम होता अशी शंका खैरे यांनी उपस्थित केली आहे. या शंकेसाठी त्यांनी आधार घेतला आहे तो गीतारंभी संजयाच्या तोंडी असलेल्या एका श्लोकाचा (१.१०). या श्लोकात भीष्माला तो कौरवसेनेचा 'रक्षण करणारा' असे म्हटले आहे. या श्लोकातच नंतर असे म्हटले आहे की पांडवांच्या सैन्याचा रक्षणकर्ता भीम आहे. (एतेषां बलं भीमाभिरक्षितम्). भीष्म हा कौरवांचा सेनापती होता याविषयी वाद नाही. तेव्हा खैरे यांच्यामते भीष्मासारखाच भीम हा पांडवांचा सेनापती होता असे सूचित होते.

परंतु अशी शंका सुद्धा येण्याचे कारण नाही. गीतारंभीच्या ज्या श्लोकाचा खैरे यांनी आधार घेतला आहे त्याच्या आधी एका श्लोकात दुर्योधन द्रोणाचार्यांना सांगतो की, पांडवांच्या सेनेचा व्यूह धृष्टद्युम्नाने रचला आहे (पाडुपुत्राणां...चमूम्। व्यूढां द्रुपदपुत्रेण १.३). पांडवांचा सेनापती धृष्टद्युम्न आहे हे दुर्योधनाला ठाऊक असले पाहिजे कारण ती घटना आधीच्या उद्योगपर्वात सांगितली आहे (५.१५४.१२) म्हणून द्रोणाचार्यांना दुर्योधन सांगतो की, पांडवांच्या सेनेचा व्यूह त्यांच्या सेनापतीने, धृष्टद्युम्नाने रचला आहे. आणि ते खरेच आहे. उद्योगपर्वातच सेनापती या नात्याने धृष्टद्युम्नाने पांडवांच्या सेनेचा व्यूह रचल्याचे सांगितले आहे (धृष्टद्युम्नो....सेनापतिस्ततः। विधिवद् व्यूह्य मेधावी युद्धाय कृतमानसः।। ५.१६१.११-१२)[१]. तेव्हा धृष्टद्युम्न पांडवांचा सेनापती होता याबद्दल शंका असण्याचे कारण नाही.

धृष्टद्युम्न पांडवांचा सेनापती असला तरी त्याच्यासह सर्व सेनेचा रक्षण करणारा कोणीतरी असण्याची आवश्यकता दिसते. तसा रक्षण करणारा म्हणून भीमाचा उल्लेख दुर्योधन करतो, सेनापती म्हणून नव्हे. कौरवांचा सेनापती भीष्म होता, त्याचेही रक्षण करणे आवश्यक होते. म्हणून दुर्योधन द्रोणाचार्यांना सांगतो की त्यांच्या सेनेच्या निरनिराळ्या विभागांच्या प्रवेशद्वाराशी उभ्या राहणाऱ्या द्रोणादि सर्व योद्ध्यांनी भीष्माचे रक्षण करावे (अयनेषु सर्वेषु यथाभागमवास्थिताः। भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि।। १.११).

मी माझ्या लेखात असे म्हटले की, पांडवांचे शिखण्डी, धृष्टद्युम्न, अर्जुन आणि युधिष्ठिर असे क्रमाने चार सेनापती झाले असे कृष्णाने वसुदेवास सांगितले. त्यावर आक्षेप घेताना खैरे म्हणतात : "येथे दिलेल्या मूळ संदर्भामध्येही पांडवांच्या 'सेनापतीं'ची नावे क्रमाने दिली आहेत असे नाही." खैरे यांचा आक्षेप क्रमाविषयी आहे की 'सेनापती' या शब्दाविषयी आहे ते कळत नाही. बहुधा दुसरी कल्पना खरी असावी, कारण खैरेही त्याच क्रमाने नावे घेतात. 'सेनापती' या शब्दाविषयी आक्षेप असेल तर माझा खुलासा असा आहे : कृष्णाच्या वृत्तांतात शिखण्डी इत्यादिकांचा 'सेनापती' या शब्दाने उल्लेख झाला नाही हे खरे. पण भीष्माचा उल्लेख करताना त्याला जर 'एकादशचमूपति' आणि सेनापति असे म्हटले असले तर त्याच्यामागोमाग शिखण्डीचा उल्लेख करताना त्याला 'सप्तचमूपति' आणि 'नेता' असे म्हटले तर 'नेता' या पदाने 'सेनापती' हा अर्थ व्यक्त होतो असे का मानू नये? नंतर धृष्टद्युम्न आणि अर्जुन यांच्या बाबतीतही तसेच म्हणता येईल. महत्त्वाचा पुरावा शेवटी मिळतो. शल्याविषयी सांगताना पहिल्या तिघांसारखा कौरवांच्या उरलेल्या सेनेचा शल्य 'सेनापती' झाला असे कृष्ण स्पष्टपणे म्हणत नाही तर कौरवांची सेना शल्याभोवती एकत्रित झाली असे म्हणतो (कौरव्याः .... अक्षौहिणीभिस्तिसृभिर्मद्रेशं पर्यवारयन् १४.५९.२२). तथापि शल्य कौरवांचा सेनापती होता या बद्दल वाद नाही. मग युधिष्ठिराच्या बाबतीत कृष्णाने जर असे म्हटले की उरलेल्या एका अक्षौहिणीसह पांडव युधिष्ठिराभोवती गोळा झाले (पांडवास्तु युधिष्ठिरम्। अक्षौहिण्या ..... शिष्टया पर्यवारयन्। १४.५९.२३) असे म्हटले तर त्या शब्दांनी युधिष्ठिराचे सेनापतिपद सूचित होते असे का म्हणू नये?

कृष्णाने वसुदेवास पांडवांचे चार सेनापती झाले असे सांगितले ते विश्वासार्ह वाटत नाही असे मी म्हटले, कारण कृष्णाच्या सांगण्यावरून असे वाटते की

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कौरवांचा कोणता सेनापती कोणाच्या हातून रणांगणावर पडणार अथवा मरणार हे जणू पांडवांनी आधीच ओळखले होते. खैरे यांचा याला आक्षेप आहे, कारण त्यांच्या मते लढाईतल्या डावपेचांच्या दृष्टीने कोणाला कोण मारू शकेल हे ओळखणे प्रतिपक्षाला जरूरच आहे.

हा आक्षेप निराधार आहे. संजयाने केलेल्या वर्णनाप्रमाणे भीष्मांचा वध शिखण्डीच्या हातून होईल हे पांडवांनी हेरले होते असे दिसत नाही. त्यांनी जर हे हेरले असते तर भीष्मांचा वध कसा होईल हे विचारायला पांडव युद्धाच्या नवव्या दिवशी रात्री त्यांच्या शिबिरात कशाला गेले असते? (६.१०३.५२–८२). महाभारतातला हा कथाभाग खुळचटासारखा असल्याने तो प्रक्षेप आहे यात संशय नाही. अशी घटना रणांगणावर घडणे अशक्य आहे. तथापि एवढे नक्की की भीष्मवधाचा उपाय पांडवांनी युद्धारंभीच हेरला नव्हता. दहाव्या दिवशी युद्ध चालू असताना अर्जुनाने शिखण्डीला भीष्माशी युद्ध करण्यास प्रोत्साहित केले. तो शिखण्डीला म्हणाला की त्याच्याखेरीज पांडवांच्या बाजूने भीष्माशी युद्ध करू शकेल असा कोणीही धनुर्धर नाही. तेव्हा त्वरा करून शिखण्डीने भीष्माला मारावे (६.११२.८१–८३). त्यानंतरच्या युद्धात शिखण्डीच्या पुढाकाराने अर्जुनाने भीष्माशी युद्ध केले (६.११४.४६ व पुढे). भीष्म शिखण्डीशी युद्ध करणार नाही[३] हे सर्वश्रुत होते. ते हेरण्याची गरज नव्हती.

द्रोणाचा वध कोणाच्या हातून होणार हे हेरण्याची आवश्यकता नव्हती. धृष्टद्युम्नाचा जन्मच मुळी त्यासाठी झाला असल्याचे (१.१५५.११, २९–३३,४०) सर्वांना माहीत होते. कृष्ण वसुदेवास सांगतो त्याप्रमाणे धृष्टद्युम्न हा केवळ पांडवांच्या सेनेचा पाच दिवसांसाठी नेता नव्हता. वर सांगितल्याप्रमाणे तो पांडवांचा सर्वसेनापती युद्धारंभीच झाला होता. भीष्मवधानंतर युधिष्ठिराने त्याला पुन्हा अभिषेक केल्याचा उल्लेख संजयवर्णनात नाही.

कर्णाचा वध करू शकेल असा योद्धा पांडवांकडे फक्त अर्जुनच होता. ते हेरण्याची गरज नव्हती. अर्जुनालाही तो चटकन आटोपण्यासारखा नव्हता. त्याला संपवण्यासाठी योग्य संधी तेवढी हेरायला हवी होती हे खरे. ती संधी कृष्णाने हेरली. युद्ध सुरू झाल्यापासून कृष्ण अर्जुनाचा सारथी होता. युद्धभूमीचा त्याला सोळा दिवसांचा दीर्घ अनुभव होता. तिथले खाचखळगे त्याला ठाऊक होते. कर्णाचा सारथी शल्य हा सारथ्यकर्मात कृष्णाच्या तोडीचा होता. पण रणभूमीच्या ज्ञानाच्या दृष्टीने तो कृष्णापेक्षा उणा होता. कर्णाचा सारथी तो युद्धाच्या सतराव्या दिवशी झाला होता. दीर्घ अनुभवामुळे कृष्णाने कर्णाच्या रथाचे चाक गर्तेकडे आणण्यात यश मिळविले, पण रणभूमीच्या अल्प अनुभवामुळे ते टाळणे शल्याला जुळले नाही. ती संधी साधून अर्जुनाने कर्णाचा वध केला. द्रोणवधानंतर अर्जुनाला सेनापतिपद मिळाल्याची नोंद संजयवर्णनात नाही. सेनापतिपद धृष्टद्युम्नाकडेच होते.

शल्यवधासाठी श्रीकृष्णाने पांडवांपैकी युधिष्ठिराची निवड का केली हे मात्र एक कोडे आहे. बाहुयुद्धात तसेच शस्त्रयुद्धात शल्य निष्णात असल्याची ख्याती होती (९.६.२, ८, १४–१५). कृष्णाच्या मते शल्य हा भीष्म, द्रोण, कर्ण यांच्या तोडीचा, किंबहुना त्यांच्याहीपेक्षा थोडा विशेष होता (९.६.२६). अशा शल्याशी लढण्यासाठी पांडवांकडील भीम किंवा अर्जुन यांची अथवा दोघांची संयुक्तपणे निवड न करता युधिष्ठिराला कृष्णाने त्याचा प्रतिद्वंद्वी ठरवले आणि शल्याचा वध करण्यास सांगितले (९.६.३०–३२) हे आश्चर्य करण्यासारखे आहे. आधीच्या युद्धात युधिष्ठिराने फार मोठा पराक्रम केला होता असे नाही. नावाने तो 'युधिष्ठिर' असला तरी काही वेळा तो युद्ध करायचे थांबवून शिबिरात परतला होता. शल्यपर्वातील युद्ध सुरू झाल्यावर शल्याने मोठा पराक्रम केला. परंतु अखेरच्या लढाईत भीमाने शल्याचे धनुष्य छेदले, त्याचा सारथी, घोडे मारले, कवच फोडले, खड्ग मोडले, ढाल कापली (९.१६.२५–३१). तेव्हा शल्य युधिष्ठिराकडे पायउतार होऊन, हात पसरून (९.१६.४७) धावला.





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्याच्या हातात तेव्हा कोणतेही शस्त्र नव्हते. त्यावरून त्याची इच्छा युधिष्ठिराशी बाहुयुद्ध करण्याची असावी. पण त्या भानगडीत न पडता युधिष्ठिराने शल्यावर शक्ति फेकली आणि त्याचा वध केला[*] (९.१६.३४–५२). अशा युद्धाला महाभारतकार 'धर्म्ययुद्ध' कसे म्हणतात ते कळत नाही (९.१६.५५). तसे युद्ध करणाऱ्या युधिष्ठिराला ते 'धर्मात्मन्' आणि 'धर्मसूनु' असे उपरोधिकपणे तर संबोधित नाहीत ना? का झाले ते सर्व ठीकच झाले असे त्यांना म्हणायचे आहे? काही कळत नाही. भारतीय युद्धात भीम आणि अर्जुन या दोन पार्थांनी मोठे पराक्रम करून प्रतिस्पर्ध्यांना लोळवले. उरला एक पार्थ युधिष्ठिर. त्याच्या हातून एकतरी कौरवांकडील मोठा योद्धा रणांगणावर पडायला हवा अशी काहीतरी जणू योजनाच होती असे वाटण्यासारखा हा सारा प्रकार आहे. या एकाबाबतीत कोणत्या प्रतिस्पर्ध्यांचा वध कोणाच्या हातून होईल हे कृष्णाने हेरले होते असे म्हणता येईल!

माझ्या लेखावरील पहिल्या आक्षेपाचे सविस्तर निराकरण एथवर केले. उरलेल्या आक्षेपांचे असे निराकरण करत नाही. वरील विवेचनावरून खैरे यांच्या इतर आक्षेपांचे स्वरूप वाचकांच्या लक्षात येईल.

कृष्णाने दिलेल्या माहितीच्या विश्वसनीयते-विषयी शंकेची पाल मनात चुकचुकावी असे त्याच्या तोंडी असलेल्या पहिल्याच श्लोकामुळे घडते. कृष्ण वसुदेवास सांगतो की भारतीय युद्धात क्षत्रियांनी केलेली अद्‌भुत कर्मे अनेक असल्यामुळे तो सर्व हकीकत थोडक्यात सांगणार आहे. अन्यथा त्यांचे वर्णन करण्यास त्याला शेकडो वर्षेदेखील कमी पडतील (बहुलत्वात् न संख्यातुं शक्यान्यब्दशतैरपि १४.५९.६). ही फार मोठी अतिशयोक्ति आहे. संजयाने जे युद्धवर्णन धृतराष्ट्रापाशी चार रात्रीच्या काही तासांत संपवले ते सारे वर्णन रोज थोडथोडे कृष्णाने सांगितले असते तरी त्याला चार-दोन दिवस पुरले असते. त्यासाठी त्याला शेकडो वर्षेही पुरणार नाहीत असे जे तो म्हणतो त्याचे मोठे आश्चर्य वाटते.

दोन बाबतीत मी खैरे यांच्याशी सहमत आहे. एक म्हणजे त्यांच्याप्रमाणेच महाभारताला आपण ज्याला इतिहास (history) म्हणतो तसा इतिहास असल्याचे मीही मानत नाही. महाभारत स्वतःला 'इतिहास' (१.१.१७,२४,५२) आणि 'आख्यान' (१.१.१६, १.२.२९,३० इत्यादि) असल्याचे मानते. त्याचा अर्थ इतकाच की 'इतिहास' असा आकृतिबंध असलेले मूळ रूपात ते एक 'आख्यान' आहे. तथापि भारतीय युद्धाविषयी माहिती मिळवण्याचे तेच एक प्रमुख साधन उपलब्ध असल्याने संजयाच्या वर्णनाच्या आधारे विधाने करावी लागतात. माझ्या लेखावर आक्षेप घेताना खैरे यांनीही संजयाच्या विधानांचा आधार घेतला आहे. या संदर्भात खैरे यांनी म्हटले आहे की महाभारतातील संहितेच्या कथनांना इतिहासमूल्य नाही असे स्पष्ट मत भांडारकर आणि दांडेकर या प्राच्यविद्यापंडितांनी गेल्या शतकात व्यक्त केले आहे. त्या दोघा पंडितांनी तसे मत निश्चितच व्यक्त केले असणार. खैरे यांनी त्यांच्या लेखांचे संदर्भ लगेच दिले असते तर वाचकांना आणि मलादेखील तो सारा भाग मुळात वाचता आला असता.

दुसरे असे की, खैरे यांच्या लेखाच्या अखेरीस ते म्हणतात की त्यांच्या मते सारे अश्वमेधपर्व महाभारतात एक प्रक्षेप आहे. ती कोणा एका कवीची स्वतंत्र रचना आहे आणि तिला महाभारतात जोडण्यात आली आहे. त्यासाठी त्यांनी कारणेही दिली आहेत. सर्व अश्वमेधपर्वाविषयी सध्या मी माझे काही मत बनविले नाही. पण त्या पर्वात प्रस्तुत विषयासंबंधी जे दोन अध्याय आहेत (५९ आणि ६०) ते प्रक्षेप आहेत असे माझेही मत आहे, आणि त्याचे कारण संजयाच्या युद्धवर्णनाच्या दृष्टीने त्या दोन अध्यायांत बरीच विसंगत माहिती आहे. हे दोन अध्याय प्रक्षेप आहेत याविषयी मी माझ्या मागच्या लेखात मतप्रदर्शन केले नाही कारण महाभारतातील एकंदर प्रक्षेपांच्या स्वरूपाविषयी एक स्वतंत्र लहानसा लेख लिहिण्याचा माझा विचार होता. खैरे म्हणतात हे पर्व कोणा एका कवीची रचना आहे. त्या कविविषयी काही निश्चित कल्पना करणे शक्य आहे


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असे मला वाटते. महाभारतातील इतर प्रक्षेप परंपरेत केव्हा तरी रचले गेले आणि घुसडले गेले असे म्हणणे शक्य आहे. या दोन अध्यायांविषयी निराळी कल्पना करणे आवश्यक आहे. महाभारताची रचना झाल्यावर व्यासांनी त्यांचा मुलगा शुक आणि सुमन्तु, जैमिनि, पैल आणि वैशंपायन या चार शिष्यांना ती शिकविली आणि शिष्यांनी ती पृथक् पृथक् प्रकाशित केली (१.७.७४-७५; १२.३२७.१६.१८). या चार प्रकाशनांपैकी आपणांस फक्त वैशंपायनसंहिता संपूर्ण उपलब्ध आहे. जैमिनि परंपरेतील फक्त अश्वमेधपर्व उपलब्ध आहे. ते वैशंपायन परंपरेहून अतिशय भिन्न आणि इ.स.च्या सहाव्या शतकाच्या सुमारांचे आहे. इतर ज्या दोन संहिता सुमन्तु आणि पैल यांनी प्रकाशित केल्या त्यातले काहीच उपलब्ध नाही. त्यातल्या एखाद्या संहितेतील हे दोन अध्याय असावेत आणि नंतर ते वैशंपायन परंपरेत समाविष्ट झाले असावेत. हा प्रक्षेप फार प्राचीन काळी झाला असला पाहिजे, कारण वैशंपायन परंपरेच्या सर्व पाठांत तो आढळतो.

प्रक्षेपाबद्दलची ही कल्पना जर खरी असेल आणि त्या संहितेतल्या युद्धवर्णनाशी कृष्णाचे वर्णन विसंगत नसेल तर त्याच्या वर्णनाला अविश्वासार्ह वगैरे म्हणता येणार नाही. पण ही 'जर-तर'ची भाषा आहे. वस्तुस्थिती अशी आहे की आपणांस फक्त वैशंपायनसंहिता आणि त्यातील संजयकृत युद्ध वर्णन उपलब्ध आहे. त्या वर्णनाशी कृष्णाचे वर्णन सुसंगत नाही हे निश्चित.

खैरे लेखाच्या अखेरीस म्हणतात, की माझ्या लेखामुळे नव्या पिढीतील अभ्यासकांसमोर मी चुकीचा आदर्श निर्माण केला आहे. खरोखर तसे घडले असेल तर माझ्या मनाला त्याचा खेद आहे. हा लेख आणि महाभारतावरील माझे इतर लेखन यांनी मी चुकीचा आदर्श निर्माण करीत आहे असे मला वाटत नाही. पण मला तसे वाटून उपयोग नाही. खैरे यांच्याखेरीज इतर वाचकांना काय वाटते ते महत्त्वाचे आहे.

**तळटीपा :**

१) धृष्टद्युम्न पांडवांचा सेनापती असल्याचे प्रत्यक्ष, अप्रत्यक्ष उल्लेख इतरत्रही अनेक आहेत (५.१६१.१,३-४; ५.१६८.४).

२) अर्जुनाच्या बाबतीत त्याला नेता असे म्हटले नाही, तर 'चम्वो बीभत्सुपालिताः' असे म्हटले आहे (१०.५९.२०).

३) भीष्म शिखण्डीशी युद्ध करणार नाही याचा अर्थ असा दिसतो, की शिखण्डीने भीष्मावर सोडलेले बाण निष्प्रभ करण्यास तो मोकळा होता. स्वतः भीष्म शिखण्डीला मारण्यासाठी त्याच्यावर बाण सोडणार नव्हता.

४) या प्रसंगी असे म्हटले आहे की युधिष्ठिराने 'गोविन्दवाक्यं' त्वरितं विचिन्त्य दध्रे मतिं शल्यविनाशनाय। ... स्मृत्वा .... यथोक्तमिन्द्रवरजस्य (९.१६.३६-३७). यावरून असे वाटते की शल्य बाहुयुद्धासाठी आव्हान देईल तेव्हा त्याच्यावर शक्ति फेकण्यास कृष्णाने युधिष्ठिरास आधीच सांगितले होते.

५) युद्धाच्या दहाव्या, पंधराव्या, सतराव्या दिवशी रात्री, आणि एकोणिसाव्या दिवशी पहाटे आदल्या रात्रीचे शिबिरातले हत्याकांड संपल्यावर संजयाने कुरुक्षेत्राहून हास्तिनपुरास येऊन धृतराष्ट्राला युद्धाची माहिती दिली. त्यासाठी त्याला काही तास लागले असतील (६.१४.२-३; ७.१.६-८; ८.१.१७; १०.९.५७).





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई



# भारताच्या महासत्तेचे मिथक

प्रा० विठ्ठल दहिफळे

२१ वे शतक ज्ञानाचे शतक असून भारत यात आघाडीवर असेल, असा युक्तिवाद केला जात आहे. साम्यवादी सोव्हिएत युनियनच्या अपयशानंतर जागतिकीकरणाच्या आधाराने २० व्या शतकाच्या उत्तरार्धापासून भारतानें वाटचाल करावयास प्रारंभ केला. त्याचे बरे-वाईट परिणाम आता दिसू लागले आहेत. उदारमतवाद्यांना जागतिकीकरणाच्या रूपात विकासाची पाऊल चिन्हे दिसू लागली तर समाजवाद्यांना ती राष्ट्रीय आपत्ती वाटू लागली. शतकांतराची गरिबी नष्ट झाल्याची पहाटस्वप्ने अनेकांना पडू लागली. महाकाय बहुराष्ट्रीय कंपन्यांनी आपले बस्तान बसावण्यास सुरुवात केल्यापासून शहरांचा तोंडवळा बदलला, शॉपिंग मॉल्स, मल्टिप्लेक्स, सुपर बझार्स, लक्झरी हायराइझेस ॲम्युझमेंट पार्क्स, गोल्फ-कोर्सेस, चकचकीत रस्ते, नव्या बँका, नवनवीन हॉटेल्स, जिकडे तिकडे झगमगाट! भारताचा कॅलिफोर्निया होणे आता दूर नाही असा विश्वास व्यक्त केला जात आहे. नव्या सहस्रकात भारत हा जगातील पहिल्या पाच अग्रगण्य राष्ट्रांपैकी एक असू शकेल अशी भविष्यवाणी माजी राष्ट्रपतींनी केली. इंडिया शायनिंग, फिल गुड या सारख्या सवंग घोषणाबाजीत भारताच्या प्रगतीचे एकीकडे लोभसवाणे दृष्य उभे करत असताना दुसरीकडे मात्र कमालीची विपन्नावस्था नजरेतून सुटत नाही. निरक्षरता, दारिद्र्य, अनारोग्य, भयकंपितता, भ्रष्टाचार, बेरोजगारी, महागाईने संत्रस्त झालेली जनता हे भारताचे दाहक वास्तव आहे. नव्या सहस्रकाच्या पूर्वार्धात भारत या सर्व विरोधाभासांसह आपली ओळख जगाला पटवतो आहे.

महासत्ता होण्याची उर्मी बाळगणे यात गैर काही नाही परंतु समृद्धीच्या अंगानें येणारे लाभ समाजातील शेवटच्या स्तरातील सामान्य माणसापर्यंत पोहोचले पाहिजेत एवढेच. भारतात एकीकडे आर्थिक विकास दर ९% पर्यंत पोहचला आहे. तर दुसरीकडे देशातील चलनवाढीचा दर १२ टक्क्यापर्यंत गेला आहे. यातून काही प्रश्न निर्माण होतात. भारताचे महासत्ता होणे म्हणजे नेमके काय? का हा केवळ एक भ्रम आहे! जागतिकीकरणाने महासत्तेची केलेली व्याख्या सर्वसमावेशक आहे काय? अलिकडे भारत महासत्ता होणार असा जो युक्तिवाद केला जातो आहे त्यास कोणता आधार आहे? क्षणभर भारत महासत्ता होईल या प्रमेयावर विश्वास जरी ठेवला तरी ती कोणासाठी? सर्वसामान्य देशवासीयांना किमान जीवनमानाची हमी उदयाचली येऊ घातलेली महासत्ता देईल काय? या सर्व प्रश्नांची उत्तरे जर नकारार्थी येत असतील तर मग याला समर्थ पर्याय कोणता? याची संयुक्तिक उत्तरे शोधण्यासाठीच हा सर्व लेखनप्रपंच आहे.

**महासत्ता म्हणजे नेमके काय?**

इ. स. २०२० सालापर्यंत किंवा त्याहीपेक्षा अगोदर भारत महासत्ता होईल असे आपली राजकीय नेते मंडळी सांगत आहेत. सामान्य जनतेला भव्य दिव्य स्वप्नात गुंतवून वास्तवापासून दूर नेणे, आभासी विश्व निर्माण करून स्वार्थ साधणे हे राजकीय नेत्यांचे नित्याचेच असते. लोकशाहीत प्रसिद्धी माध्यमांनी जनहिताची पाठराखण करावी ही अपेक्षा असताना ती नेत्यांचे कपोलकल्पित चित्र रेखाटण्यातच धन्यता मानीत आहेत ही शोकांतिका आहे. राजकीय अभिजनांचा हा दावा (भारत एक महासत्ता होणार) खोडून काढण्यापूर्वी महासत्ता म्हणजे नेमके काय, हे पाहणे उचित राहील. विश्वसमुदायाचे हे दुर्दैव आहे की, महासत्तेची व्याख्या जागतिकीकरणाने केली आहे. कोणतेही राष्ट्र प्रगत आहे की अप्रगत हे ठरविण्याचे काही निश्चित निकष आज सर्वमान्य झालेले आहेत. एखाद्या राष्ट्राची एकूण संपत्ती, त्या राष्ट्रात राहणाऱ्या जनतेचे एकूणच उंचावत जाणारे राहणीमान, जागतिक बाजारपेठेत त्या राष्ट्राची असलेली प्रतिष्ठा किंवा पत या प्रमुख निकषांबरोबरच त्या देशाचा आंतरराष्ट्रीय व्यापारातला असलेला सहभाग,

अनुक्रमणिका

देशाजवळ असलेला परदेशी चलनाचा साठा, सामाजिक स्थिती या प्रमुख निकषांआधारे एखादा देश प्रगत आहे की अप्रगत हे ठरविले जाऊ शकते.[१]

जागतिकीकरणाच्या प्रभावातून महासत्तेची केलेली उपरोक्त व्याख्या परिपूर्ण आहे. असे मात्र म्हणता येणार नाही. मानव हा मूलतः आर्थिक प्राणी आहे. या एकाच गृहितकाला प्रमाण मानून करण्यात आलेली ती व्याख्या आहे. सुरुवातीपासूनच प्रगत पाश्चिमात्त्य भांडवलवादी देशांचा मानवी जीवनाबाबतचा एकूणच दृष्टिकोण इहवादी असल्यामुळे या संदर्भातील विकास व प्रगती प्रक्रियांना भौतिक श्रेयप्राप्तीच्या दृष्टीने आर्थिक संदर्भाचेच सुकाणू प्राप्त झाले आहे.[२] एकदा का आर्थिक संदर्भाला एखाद्या राष्ट्राच्या जीवनात अग्र स्थान मिळाले की त्याचे पर्यावसान जीवघेण्या स्पर्धेत होते आणि इथेच सुरू होते कधीही न संपणारी अखंड शोषण शृखंला. विश्वसमुदायाने याचा कटू अनुभव दोन वेळा घेतला आहे, अंधकारयुगाच्या अस्तानंतर, प्रबोधनचळवळीचे बोट धरून अवतरलेल्या आणि युरोपातील औद्योगिक क्रांतीची फलनिष्पत्ती म्हणून जगभर फोफावलेल्या साम्राज्यवाद, वसाहतवादाच्या रूपात, तर दुसऱ्यांदा जागतिकीकरणातून अस्तित्वात आलेल्या आर्थिक साम्राज्यवादाच्या स्वरूपात. या दोन पैलूंच्या पार्श्वभूमीवर असे प्रतिपादन केले जाऊ शकते की, जागतिकीकरणातून पुढे आलेले महासत्तेचे प्रतिमान सदोष आहे. मानवी जीवनाला केवळ एक आणि एकच किनार असूच शकत नाही. कारण सामाजिक, सांस्कृतिक, मानसिक पैलूंनाही आर्थिक संदर्भाइतकेच मानवी जीवनात महत्त्व असते.[३] याचा सर्वसमावेशी विचार तथाकथित पश्चिमी महासत्तेच्या प्रतिमानात झालेला दिसत नाही.

**राजकीय अभिजनांनी महासत्तेच्या केलेल्या व्याख्येला प्रमाण मानायचे काय?**

हा या अनुषंगाने दुसरा मौलिक प्रश्न उपस्थित होतो. सर्वसामान्य कष्टकरी माणसाच्या दृष्टीने संपन्नावस्थेचा अर्थ काय? जिथे दारिद्र्याचे कायम उच्चाटन झालेले असेल, शिक्षणाचा सार्वत्रिक, सर्वदूर प्रसार झाला असेल, सार्वजनिक आरोग्याबाबत जिथे सजगता असेल, चांगले औषधोपचार आणि अन्य आधुनिक वैद्यकीय सोयी सामान्य माणसालाही सहज साध्य असतील. अन्न, सुरक्षा, सामाजिक न्याय, रोजगार निर्मिती व हमी, चढता मानव विकास निर्देशांक, तंत्रज्ञानात स्वयंपूर्णता आणि एकूणच या सर्वांचा परिपाक म्हणून समाजातील सर्वात खालच्या स्तरातील व्यक्तीचे जीवन सुखी होईल अशी परिस्थिती निर्माण होणे यालाच समृद्धी, संपन्नावस्था असे म्हणता येते. या निकषावर भारताचे तथाकथित महासत्ता होणे तपासावे लागते. भारत महासत्ता होणार आहे यावर थोड्यावेळासाठी विश्वास जरी ठेवला तरी भारताने अमेरिकेसारखे अथवा पश्चिमी (प्रगत?) राष्ट्रांसारखे महासत्ता व्हावे काय? ज्याला आपण विश्वातील सर्वश्रेष्ठ शक्ती म्हणून ओळखतो त्या अमेरिकेचा खरा चेहरा कसा आहे? मक्तेदारी भांडवलशाही असलेल्या या देशात राजकीय सत्ता कोणाच्या हाती असते व ती कोणाच्या भल्यासाठी राबविली जाते? पश्चिमी विकसित राष्ट्रांमधील स्वातंत्र्याची व हक्कांची प्रत्यक्ष वस्तुस्थिती काय आहे? या प्रश्नांची उत्तरे शोधली तर लोकशाही स्वातंत्र्याच्या बुरख्या आड किती कुरूप असे सामाजिक, राजकीय वास्तव दडले आहे हे सहज लक्षात येते. शिखर पातळीवर श्रेष्ठींच्या (अभिजन) हाती कमालीची आर्थिक, राजकीय वैचारिक सत्ता आणि तळपातळीवर आर्थिकदृष्ट्या परावलंबी, राजकीय दृष्ट्या सत्ताविहीन आणि वैचारिकदृष्ट्या नि:शस्त्र असलेला व जमेल त्याने भाडोत्री म्हणून वापरावा असा जनसंमर्द असेच काहीसे चित्र अमेरिका व पश्चिमी राष्ट्रांत पहावयास मिळते. कोणत्याच अर्थाने मुक्त समाज या देशांत आढळत नाही.

**भारत महासत्ता होणार यास आधार कोणता?**

मुक्त भांडवलदारी व्यवस्थेच्या आश्रयाने व प्रभावाखाली होणारी सर्वेक्षणे भारत महासत्तेच्या दिशेने वाटचाल करत आहे, असे चित्र निर्माण करीत आहेत. भारतीय अर्थमंत्रालयाच्यावतीने सन २००६ साली केलेल्या आर्थिक संख्याशास्त्रीय अहवालात (Indian economy statistical report) भारत जगातील





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चौथी वर्धिष्णु अर्थव्यवस्था असून २०२० सालापर्यंत अमेरिका व चीननंतर तिसरा सर्वात मोठा GDP असणारा देश असेल असे नमूद करण्यात आले होते. हा अंदाज ग्राहकांच्या क्रयशक्तीची सममूल्यता प्रमाण मानून व्यक्त करण्यात आला होता.[४] (purchasing power parity). आज असे म्हटले जात आहे की ज्ञानाच्या क्षेत्रातील क्रांतीचा प्रारंभ भारतात झाला आहे. २०१० पर्यंत ७०% ज्ञानाधारित सेवा क्षेत्र एकट्या भारताच्या ताब्यात असेल.[५] मागील पाच वर्षात १०० पेक्षाही अधिक माहिती तंत्रज्ञान व विज्ञान (IT and Science) क्षेत्रातील परकीय कंपन्यांनी भारतात आपले संशोधन व विकास (R and D) लॅब्स स्थापन केले आहेत.[६] भारतात उच्च दर्जाची लेखांकन (Accounting) सुविधा उपलब्ध असून २००४ या एका वर्षात २,००,००० अमेरिकन उत्पन्न परताव्यावर (us tax returns) प्रक्रिया भारतात होऊ शकली. टाईम झोन बेनिफिटही भारतासाठी वरदान ठरला आहे. कारण अमेरिकेसहित अनेक पाश्चिमात्त्य देशातील जनता झोपी गेलेली असते तेव्हा भारतात सॉफ्टवेअर प्रोग्राम्स, डाक्यूमेंटेशन, कॉलसेंटर्स कार्यरत राहतात. हल्ली मेडिकल टुरिझमच्या माध्यमातून भारताला मोठ्या प्रमाणात परकीय चलन प्राप्त होत आहे. व्यवसाय प्रक्रियाधारित क्षेत्रही (BPO) वेगाने विकसित होत आहे. सेंडर या बिझनेस विकलीने २००६ मधील सर्वेक्षणात असे नमूद केले आहे की, २००५ साली जागतिक पातळीवर IT व BPO सेवाक्षेत्रात ७.१ % ने वाढ झाली तर भारतात याच क्षेत्रात ३३% नी वाढ झाली होती.

दुसऱ्या बाजूने कृषी क्षेत्रातही भारत मागे नाही असा दावा शासकीय पातळीवर वेळोवेळी केलेल्या सर्वेक्षणातून केला जातो. भारतात जगातील दुसऱ्या क्रमांकाची लागवडी योग्य जमीन आहे.[७] शिवाय वेगवेगळ्या प्रकारचे शेतीनुकूल हवामान क्षेत्र असल्यामुळे उत्पादनात सातत्य राहते. भारत हा जगातील दुसऱ्या क्रमांकाचा अन्नधान्य उत्पादक देश असून प्रतिवर्षी २१० मिलीयन टनापेक्षा अधिक अन्नधान्याचे उत्पादन देशात होते. २०१० पर्यंत अन्न प्रक्रियाधारित उद्योगात भारत २८ US बिलीयनची गुंतवणूक करणार आहे. महत्त्वाचे म्हणजे अलिकडे लष्करी क्षेत्रातही देशाने आघाडी घेतली असून जगातील चौथे सर्वात मोठे लष्करी सामर्थ्य असलेला भारत अण्वस्त्रसज्ज देश आहे.[८] अवकाश संशोधन क्षेत्रातही नेत्रदीपक भरारी देशाने घेतली आहे. अगदी व्यावसायिक पातळीवर प्रगत पाश्चिमात्त्य देशाप्रमाणे भारत इतर देशांचेही उपग्रह अवकाशात प्रक्षेपित करीत आहे.

**भारत महासत्ता होणार हे एक मिथक आहे.**

भारताचा प्रवास महासत्तेच्या दिशेने होत आहे असे वरवर पाहता भासत असले तरी वस्तुस्थिती पूर्णतः भिन्न वा वेगळी आहे. भारत कोणासाठी महासत्ता होणार आहे हा महत्त्वाचा प्रश्न आहे. सर्वसामान्य देशवासियांना तथाकथित भासमय महासत्ता किमान जीवनमानाची हमी देऊ शकेल काय? जागतिकीकरणाच्या आधाराने येणाऱ्या समृद्धीने भारतातील मूठभरांचे जिणे संपन्न जरूर केले असेल पण सर्वसामान्यांचे काय? आजही ते उपेक्षिततेच्या गर्तेमध्येच आहेत. सत्तर कोटीपेक्षा अधिक जनता अठराविश्वे दारिद्र्य, औदासिन्य, हताशपणा, निकृष्ट दर्जाचे राहणीमान, अनारोग्य, उपरेपणा यातच खितपत पडली आहे. तंत्रज्ञानाने केलेली प्रगती जरी नाकारता येत नसली तरी त्याचा लाभ हावरटांच्या खिशात पडतो आहे त्याचे काय?[९] सर्वात महत्त्वाचे म्हणजे सामान्यांना आपण लुटले जात आहोत हे लक्षातही येत नाही. वास्तविक पाहता या बाबतची जाणीव जागृती विचारवंतानी, अभ्यासकांनी, समाजधुरीणांनी करावयास हवी. परंतु हे होताना दिसत नाही. उलट खेदाने असे म्हणावेसे वाटते की, ज्यांनी एकेकाळी क्रांतीची मशाल पेटविली त्या वर्गातच बौद्धिक आळस संचारला आहे. मिथकभंजन थांबले आहे यामुळेच इंडिया शायनिंग, फिलगुडचे फावते आहे. ज्योतिराव फुल्यांनी मिथक भंजन केले होते. चार्वाक आणि बुद्धाच्या ठिकाणी असलेला अनात्मवाद, सत्यशोधकता हे त्यांचे विचारवैभव होते.[१०] प्रस्थापित व्यवस्थेपासून लाभांकित झालेला गट त्तिच्या विरोधात


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कधीच बोलत नसतो, तो एकप्रकारे मिंधा असतो तेव्हा व्यवस्थेचे चटके सोसाव्या लागणाऱ्या समुदायाकडूनच परिवर्तनाचे रणशिंग फुंकले जाणे अपेक्षित असते. बुद्धिवाद्यांनी सत्यकथन करून आभासी जगातून बाहेर पडण्याची प्रेरणा जनता जनार्दनाला द्यायला हवी.

जागतिकीकरणाने कोणत्याही देशातील वंचितांना सबळ केले नाही. तिचे सूत्रच मुळी सबलांना अधिक सबल करणे व दुर्बलांना अधिक दुर्बल करणे हेच असते. मानवी नीतिमत्ता घडवण्याच्या दृष्टीने भांडवलशाही व्यवस्था मूलतःच असमर्थ असते. आर्थिक स्पर्धेतील यशापयशानुसार जी व्यवस्था साधनसामग्रीचे वितरण करते ती अन्याय व भेदभाव करणारच हे उघड आहे. बाजारचक्रालाच प्रमाण मानून भांडवलशाही प्रवृत्तींना शिरोधार्य मूल्यांचा दर्जा देणाऱ्या या व्यवस्थेत शोषित वंचित अधिकच शोषित वंचित होणारच याला भारत अपवाद राहणार तरी कसा?

सामाजिक, राजकीय, आर्थिक पातळीवर मुक्त भांडवली व्यवस्थेचा स्वीकार केल्यापासून अतिशय कटू अनुभव देशवासियांना घ्यावे लागत आहेत. एकीकडे मूठभरांच्या जीवनशैलीत लक्षणीय-रित्या बदल होत आहेत तर दुसरीकडे समाजातील बहुसंख्य वर्ग आजही स्वातंत्र्यपूर्वकालीन स्थितीतल्या-सारखेच जिणे जगतो आहे. शहरे फुगत चालली आहेत पण त्याच बरोबरीने बकाल वस्त्यांचा आकारही दिवसेंदिवस वाढतच चालला आहे. उदारीकरणाच्या या युगात एकीकडे जागतिक समाजाची कल्पना केली जात आहे. तर दुसरीकडे आपल्या देशात जातिनिहाय सम्मेलनांची संख्याही वाढत चालली आहे. जमातवादाने उग्र रूप धारण केले आहे. बंधुभाव शेष राहिला नाही. सामाजिक मने परस्परापासून जणू फाकत चालली आहेत. संस्कृती सुरक्षित नाही. बेकारी, भिकारी, गुन्हेगारी, चंगळवाद हा बाजाराभिमुख व्यवस्थेचाच परिणाम होय. ९० च्या दशकात खेड्यांच्या मजबुतीकरणासाठी आणि पायाभूत सुविधांच्या निर्मितीसाठी भारताने वैश्विकरणाच्या प्रक्रियेत सहभागी होणे कसे अत्यावश्यक आहे, असे सांगणाऱ्या शासकीय अभिजनांनी बहुजन समाजाच्या उन्नतीसाठी ही चळवळ राबविली जाईल असे आश्वासन दिले होते. पण गेल्या दीड दशकातील जागतिकीकरण प्रक्रियेचा भारताच्या संदर्भातील अनुभव लक्षात घेतला असता बहुजनांच्या तोंडाला पाने पुसून अभिजनांच्याच हितसंबंधाची अधिक काळजी या व्यवस्थेने वाहिली आहे हे सांगण्यास कोणत्याही ज्योतिषाची गरज नसावी. मानवाधिकारांच्या बाबतीतही स्थिती उत्साहवर्धक नाही. १९९८ साली मानव विकास निर्देशकांच्या संदर्भात जगात भारत १२८ व्या स्थानावर होता तर शेजारील चीन ९९ व्या क्रमांकावर होता.[११] प्रदेशवाद, भाषावाद, नक्षलवाद, जमातवाद, दहशतवाद, भ्रष्टाचार यासारख्या राष्ट्रविघातक प्रवृत्तींनी देशाला खोकले करून सोडले आहे. ट्रान्सपरन्सी इंटरनॅशनल या संस्थेने नुकत्याच तयार केलेल्या अहवालात जगातील १८० देशात भ्रष्टाचारात भारताला ७४ वा क्रमांक दिला आहे. जेवढा भ्रष्टाचारी देश तेवढा त्याचा क्रमांक मोठा हे या निर्देशांकाचे सूत्र असे. या अपप्रवृत्तींना वेळीच लगाम घालून राष्ट्राच्या प्रगतीचा मार्ग प्रशस्त करण्याचे सामर्थ्य भांडवलशाहीच्या दावणीला बांधलेल्या शासनात राहिले नाही.

राजकीय क्षेत्रात कधी नव्हे एवढी खालची पातळी आपण गाठली आहे. एकीकडे आपण मोठ्या दिमाखाने म्हणतो की भारत हा जगातील सर्वांत मोठा प्रजासत्ताक देश आहे. पण दुसरीकडे सार्वजनिक सत्तेमधील लोकांचा सहभाग आक्रसत चालला आहे. राजकारण धनदांडग्यांचा व गुंडांचा अड्डा झाला आहे. समाजकारणी आणि बुद्धिवाद्यांना या क्षेत्रात यश मिळण्याची खात्री नसल्यामुळे गुंड-पुंडासाठी रान मोकळे झाले आहे. राजकारणात नीतिमत्तेला स्थान राहिले नाही. राजकारण म्हणजे प्रतिस्पर्ध्यावर मात करण्याच्या दृष्टीने रचलेला कुटील डाव नव्हे, तर स्पर्धात्मक हितसंबंध साध्य करण्यासाठी टाकलेले ते एक मुत्सद्दी पाऊल आहे याचे साधे भानही नेत्यांना राहिले नाही. मतदारांच्या प्रश्नांसाठी झगडणे तर सोडाच पण संसदेत प्रश्न विचारण्यासाठी लाच घेतली जाते अशा प्रजासत्ताकाला काय भवितव्य असू शकेल? कोणत्या दिशेने आपला प्रवास सुरू आहे? कोणत्याही



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

राजकीय पक्षाकडे वंचितांचे प्रश्न सोडविण्यासाठी कृतीयोजना नाही. भारताला आर्थिक महासत्ता बनवून दाखवू या एकाच सक्तीच्या महत्त्वाकांक्षेभोवती बहुतांश पक्षांचे राजकारण फिरत आहे. लोकशाहीत 'लोक' ही राजकारणातील ऊर्जा असते तर 'वादप्रवणता' (contestations) हे त्याचे इंधन असते.[१२] परंतु आज भांडवलदारांच्या कच्छपी लागलेले लोकनेते आपली संघर्षप्रवणता गमावून बसले आहेत. चळवळीमधून पुढे आलेले व एकेकाळी वाघासारखी डरकाळी फोडणारे नेतृत्व (जॉर्ज फर्नांडिस) जागतिकीकरणाच्या लाटेवर स्वार होऊन शेळीसारखे वर्तन करताना लोकांनी अनुभवले आहे.

आर्थिक क्षेत्रातही आपली वाटचाल कासवगतीने सुरू आहे. कृषी, शिक्षण, आरोग्य अशा मूलभूत बाबींवर जागतिकीकरणाचा विपरीत प्रभाव पडत आहे. भारताच्या एकूण राष्ट्रीय उत्पन्नात कृषी क्षेत्राचा वाटा २०% आहे. परंतु त्यावर एकूण राष्ट्रीय श्रमशक्तीच्या ६०% रोजगार अवलंबून आहे.[१३] भारताचे कृषीमंत्री भलेही शेतकऱ्यांना शेती करणे आता सोडून द्या असा सल्ला देत असतील परंतु आजही मोठ्या प्रमाणात रोजगार उपलब्ध करून देण्याचे कार्य कृषी क्षेत्रालाच करावे लागणार आहे. हे वास्तव नाकारता येत नाही. कारण कृषी हा बहुसंख्य भारतीय लोकांचा केवळ व्यवसायच नाही तर जीवन जगण्याची पद्धती आहे. शासनाची धोरणे कृषी क्षेत्राला मारक ठरत आहेत. परिणामी जागतिकीकरणाच्या रेट्यामुळे कृषीक्षेत्रातील शासनाची गुंतवणूक कमी कमी होत चालली आहे. पहिल्या योजनेत १४.९% असलेली शासकीय गुंतवणूक दहाव्या योजनेत ३.९% पर्यंत घसरली आहे.[१४] याचा विपरीत परिणाम कृषी विकासदरावर झाला आहे. १९८० च्या सुमारास कृषी विकासाचा दर ०.३% होता. मागील दोन अडीच दशकात त्यात सातत्याने घट झाली आहे. उदा. २००४-०५ ला तर ०.०% कृषी विकास दर झाला होता. २००६-०७ वर्षात २.७% पर्यंत राहिला. याचा अर्थ असा होतो की, शेती हा आता हळूहळू अनुत्पादक व्यवसाय होत चालला आहे. दीड लाखापेक्षा अधिक शेतकऱ्यांनी आतापर्यंत आत्महत्या केल्या आहेत ही कोणत्याही विकसनशील राष्ट्रासाठी शोभनीय गोष्ट नाही.[१५]

खाऊजा धोरणाने भारतात शिक्षणाचेही मातेरे केले आहे. उच्च शिक्षणातून सरकार हळूहळू जबाबदारी काढून टाकण्याच्या मार्गावर आहे. तर जेथे प्राथमिक शिक्षणावर सर्वाधिक खर्चाची गरज असताना मागासलेल्या देशांपेक्षाही अल्प गुंतवणूक केली जात आहे हे पुढील आकडेवारीवर नजर टाकली असता सहज लक्षात येते. २००२-०४ या कालावधीत भारतात एकूण राष्ट्रीय उत्पन्नाच्या (GDP) केवळ ३.३% खर्च शिक्षणावर करण्यात आला होता. तर हाच खर्च नेपाळमध्ये ३.४% इराणमध्ये ४.८%, मलेशियात ८.०%, करण्यात आला, तसेच या काळात शासनाचा शिक्षणावरील एकूण खर्च भारतात १२.७% झाला तर नेपाळमध्ये १४.९%, बांग्लादेशात १५.५% आणि मलेशियात २८.०% करण्यात आला.[१६] भारत सरकार देशातील एकूण १८,००० महाविद्यालयांपैकी केवळ ८,००० महाविद्यालयांना अनुदान देऊ शकले आहे उरलेली १०,००० महाविद्यालये आजही शासकीय अनुदानाच्या प्रतिक्षेत आहेत. स्वातंत्र्योत्तर काळात विद्यापीठाच्या संख्येत लक्षणीय वाढ झाली असली तरी शिक्षणाच्या दर्जात मात्र फारशी सुधारणा होऊ शकली नाही. (१९४७ ला भारतात २५ विद्यापीठे होती आजमितीला ३७२ विद्यापीठे आहेत तर ही संख्या जपानसारख्या छोट्या देशात ९,००० व शेजारील चीनमध्ये ४,००० अशी आहे.) ११ व्या योजनेवर सादर करण्यात आलेल्या एका पेपरमधील निष्कर्षात असे नमूद करण्यात आले आहे की, "शाळेची पहिली चार वर्षे पूर्ण करणारी ३८% मुले-मुली लहान-लहान वाक्यांनी मिळून बनलेल्या साध्या परिच्छेदाचेही वाचन करू शकत नाहीत, ज्याचे वाचन दुसऱ्या इयत्तेमधील विद्यार्थ्यांनी केले पाहिजे अशी अपेक्षा असते, तर ५५% विद्यार्थी तीन अंकी संख्येला एक अंकी संख्येने भागाकार देऊ शकत नाहीत" याचा अर्थ महासत्तेकडे अगदी वेगाने वाटचाल करणाऱ्या देशात शैक्षणिक गुणवत्तेचा स्तर

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

किती खालावलेला आहे हे लक्षात येते. साक्षरतेच्या प्रश्नावरही मागील तीन दशकापासून विचारमंथन चालू आहे. त्याबाबत कृती कार्यक्रमही आखले जात आहेत. मात्र इथेही फारशी प्रगती झाल्याचे चित्र दिसत नाही. १९९१ ला भारतात साक्षरतेचे प्रमाण १८.३३% होते त्यात २००१ साली वाढ होऊन ६५.३८% झाले आहे असे असले तरी ३४% निरक्षर आजही भारतात राहतात. याचाच अर्थ असा की महासत्ता होऊ घातलेला भारत जगातील सर्वात मोठा निरक्षरांचा देश आहे.

सार्वजनिक आरोग्याच्या संदर्भातही कमालीची बेफिकीरी व उदासीनता आहे. पर्याप्त शासकीय गुंतवणूक होत नाही. हे पुढील तुलनात्मक आकडेवारीवरून सिद्ध होते. २००३ साली भारतात आरोग्यावर २७ US डॉलर दरडोई खर्च झाला तर तोच खर्च श्रीलंकेत ३१ $ थायलंडमध्ये ७६ $ इराणमध्ये १३१ $ तर मलेशियात १६३ $ करण्यात आला. भारतात प्रतिवर्षी सर्वाधिक गर्भवती मातांचे मृत्यू होतात. जगातील सर्वात कमी वजनाची मुले भारतात जन्मतात. अमर्त्यसेन यांच्या निरीक्षणानुसार अफ्रिकेमधील अनेक मागासलेली राष्ट्रे ही भारतापेक्षा मुलांना अधिक सकस आहार देत आहेत. पिण्याच्या स्वच्छ पाण्याअभावी लहान मुलांना अनेक आजारांना सामोरे जावे लागते. कित्येकांचा त्यात बळीही जातो. दूषित पाण्यामुळे जगभरात दररोज ४,००० लोकांचा बळी जातो असे W.H.O. च्या पाणी स्वच्छता आणि आरोग्य कार्यक्रमाचे समन्वयक जेम्स बर्टरम यांनी सादर केलेल्या अहवालात म्हटले आहे. ११ व्या योजनेवर सादर करण्यात आलेल्या शोधनिबंधात आरोग्याच्या क्षेत्रात भारताची उपलब्धी शेजारील श्रीलंका, चायना, मलेशिया, व्हिएटनामपेक्षाही कमी आहे, असे निःसंदिग्धपणे म्हटले आहे. हा सर्व तपशील मांडण्याचे प्रयोजन असे की, भारत महासत्ता तर नव्हेच पण शेजारील मागासलेल्या देशांपेक्षाही निम्न दर्जाचे राहणीमान असणाऱ्यांचा देश आहे.

जगातील सर्वाधिक म्हणजे जवळपास ३५ कोटी श्रीमंत मध्यमवर्ग असणाऱ्या या देशात जगातील सर्वाधिक दरिद्री लोकही वास्तव्य करतात. बेकारी, भिकारी, झोपडपट्टी ही या देशातील गंभीर समस्या असून उदारीकरणामुळे त्याचे स्वरूप अधिकच उग्र झाले आहे. १९८३ मध्ये UPS बेसवर आधारित बेकारांची संख्या ७.९८ मिलीयन होती, १९९३-९४ या काळात ती ९.०२ मिलीयन झाली, १९९१-२००० मध्ये १०.५१ मिलीयन आणि २००४-०५ सालात ती १३.१० मिलीयनपर्यंत पोहोचली आहे. भारताच्या श्रमशक्तीमध्ये प्रतिवर्षी २.५% नी वाढ होत आहे. परंतु प्रत्यक्ष रोजगारात मात्र २.३% वाढ होत आहे. यामुळे नवीन रोजगार निर्मितीचा प्रश्न तर सोडाच उलट वाढत्या श्रमशक्तीचा एक मोठाच बॅकलॉग तयार होत आहे. विश्वाच्या एकूण सकल राष्ट्रीय उत्पन्नाच्या केवळ १.५% उत्पन्न भारतात होते पण एकूण जनसंख्येच्या १५% लोकसंख्या भारतात वास्तव्य करते.

आर्थिक उदारीकरणाच्या काळात चीन, जपान, इटालीच्या तुलनेत भारतात बिलेनियर्सची संख्या जरी वाढली तरी दारिद्र्य रेषेखाली जीवन जगणाऱ्यांच्या संख्येत मात्र घट होऊ शकली नाही. ३०० मिलीयनपेक्षाही अधिक लोक भारतात दारिद्र्य रेषेखाली जीवन जगत असून त्यांचे जीवन अत्यंत कष्टमय अवस्थेत आहे. पशूपेक्षाही बदतर आहे, हे जळजळीत वास्तव आहे.

**पर्याय काय देता येईल?**

या आपत्तीमधून बाहेर कसे पडावे हा बुद्धिवाद्यांच्या दृष्टीने चिंतनाचा विषय आहे. प्रत्येक व्यवस्थेला पर्याय असतो फक्त गरज असते ती शोधक दृष्टीची. शोषणाधारित जागतिकीकरणालादेखील पर्याय आहे. सर्वप्रथम आपण हे लक्षात घेतले पाहिजे की, जागतिकीकरणाच्या प्रक्रियेमधून उदयास आलेल्या महासत्तेच्या प्रतिमानात "एखाद्या देशातील दरडोई उत्पन्नात झालेली वाढ किंवा वस्तूंच्या तसेच सेवांच्या मूल्यांच्या बेरजेत म्हणजेच स्थूल राष्ट्रीय उत्पादनात किंवा उत्पन्नात वाढ म्हणजे विकास असे सोपे गणित मांडले जाते."[१७] दुसऱ्या शब्दात आर्थिक वाढीलाच विकास संबोधण्याची गल्लत केली जाते. वस्तुतः आर्थिक विकास जेव्हा वंचितता दूर करतो व सामान्य जनतेची क्षमता, त्यांच्या जीवनाची गुणवत्ता वाढवितो


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तेव्हाच त्याला महत्त्व दिले गेले पाहिजे. परंतु जागतिकीकरण व मुक्त भांडवली व्यवस्थेत वरवरच्या नागरी झगमगाटालाच विकास संबोधण्याची चूक केली जाते. हा विकास नसून विकासाचा आभास असतो.

आता नव्या प्रतिमानाचा विचार करू. पर्यायी प्रतिमानाची सुरुवात जनसहभागित्व आणि जन-जागृतीच्या माध्यमातून करता येण्यासारखी आहे. भारतीय अर्थनीतीमधून जागतिकीकरण प्रक्रियेला आजमितीला तरी पूर्णपणे वजा करून सत्तर व ऐंशीच्या दशकात आदर्श ठरलेल्या मिश्र अर्थव्यवस्थेकडे जाणे शक्य वाटत नाही. असे करणे म्हणजे घड्याळाचे काटे उलटे फिरविण्यासारखे आहे. त्यामुळे आहे त्या व्यवस्थेलाच अधिक कार्यक्षम, शोषणरहित, समन्यायी करावे लागणार आहे. हे काम ज्यांचा विवेक जागा आहे व ज्यांना खरोखरच जनसामान्याबद्दल तळमळ आहे अशा कृतीसन्मुख व्यक्ती, गट, स्वयंसेवी संस्थांना करावे लागेल. या नव्या प्रतिमानात निर्वाह गरजा भागविण्यासाठी आवश्यक संसाधने व मूलभूत सेवा सर्वांना प्राधान्याने व परवडतील अशा दराने देण्याची हमी असेल. औद्योगिकीकरण, अद्यावत तंत्रज्ञानाचे ऐहिक प्रतिमानाला वावडे असणार नाही. निर्वाह गरजांच्या पलिकडे ऐहिक समृद्धीच्या दिशेने जाण्यासाठी यात औद्योगिकीकरण, अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा स्वीकार करण्यात येईल. परंतु ते सर्वार्थाने विकेंद्रित असेल. आधुनिक विज्ञान आणि तंत्रज्ञानाचा एकीकडे नेमका व चातुर्याने उपयोग केलेला असेल पण त्याचवेळी दुसरीकडे सामाजिक समस्या व पर्यावरणाची हानी होणार नाही याचीही काळजी घेतली जाईल. अर्थातच अशा प्रयत्नांना राजकीय व खासगी क्षेत्रामधील हितसंबंधीयांकडून विरोध होणार नाही असे नव्हे. स्थानिक समाजगट विविध स्वयंसेवी संघटना, लोकचळवळी आणि पर्यायी विकास प्रतिमानाशी ज्याची ज्याची म्हणून बांधिलकी आहे अशा सर्वांना त्याचे उत्तर द्यावे लागेल. यासाठी अभ्यास, संशोधन, लिखाण, जनजागृती, दबावगटांची स्थापना इ. विविध मार्गांनी प्रयत्न करावे लागतील. लोकचळवळींना दाबून टाकण्यासाठी प्रस्थापितांकडून बळाचा वापर होईल. प्रसंगी प्रलोभनेही दाखविली जातील परंतु याही स्थितीत कार्यकर्त्यांना आपले मनोबल कायम ठेवावे लागेल. लोकशाहीत शासनाला कोंडीत पकडण्याच्या नामी संधी अनेक वेळा येत असतात त्या त्या वेळी आपले शक्ती प्रदर्शन करून वंचितांच्या विरोधी जाणारे प्रत्येक धोरण हाणून पाडता आले पाहिजे.

प्रचलित शिक्षणपद्धतीचाही नव्याने विचार केला पाहिजे कारण ती व्यक्तीच्या अस्मितेचा, जाणिवांचा आणि कार्यशक्तीचा परिपोष करण्याऐवजी प्रस्थापित व्यवस्थेतील अनेक भ्रामक मूल्ये समाजाच्या माथी मारणारी व गळी उतरविणारी कार्ययंत्रणा बनली आहे.[८] यामुळे सामाजिक बांधिलकीच्या आशयाचा अवकाश दिवसें-दिवस आकुंचित होत असून व्यक्ती-वस्तू-व्यक्ती असे गुंतागुंतीचे परोक्ष संबंध असणारी समाज व्यवस्था निर्माण होत आहे. म्हणूनच 'इव्हान इलीच' सारखा विचारवंत समाजाचे निःशालायीकरण करावे असे म्हणत असावा. यातील गंमतीचा भाग सोडला तर खरोखरच प्रचलित शिक्षणपद्धतीत व्यक्तीच्या सुप्त गुणांना, कार्यशक्तींना वाव देण्याची ताकद राहिली नाही. हे मान्य करावे लागते. याचा गांभीर्याने विचार झाला नाही तर समाज जीवनात एका बाजूने एकाकीपणाची तर दुसऱ्या बाजूने विद्रोहाची, समूळ विध्वंसनाची वृत्ती उफाळल्याशिवाय राहणार नाही.

सर्वोद्धारासाठी कोणताही एक विचार परिपूर्ण असू शकत नाही. कारण इतिहास साक्षी आहे की, उदारमतवादाने व्यक्तीस्वातंत्र्याचा डांगोरा पिटत विकास केवळ भांडवलशाही उदारमतवादाच्या आधारेच साधला जाऊ शकतो, अशी मांडणी करून पर्यायी विचारांना नकार दर्शविला, परंतु वास्तवात या वादाचा आविष्कार विषमता, शोषण व वंचितता या विकृतीत झाला तर साम्यवादाने समतेचे पडघम वाजवित शोषित वंचितांच्या उन्नतीसाठी आम्हाला विकल्प असू शकत नाही हे अभिमानाने सांगितले, परंतु प्रत्यक्षात या वादाचे प्रकटीकरण हुकुमशाहीत झाले. स्टॅलिन, माओ आणि कॅस्ट्रो यांच्या दंड शाहीत राष्ट्र म्हणजे एक तुरुंगच होता. गांधी विनोबा प्रणित सर्वोदयी विचार आणि आंबेडकरी

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विचारधारेची प्रत्यक्ष या देशाच्या मातीशी नाळ असल्यामुळे सामाजिक न्यायाचे उद्दिष्ट सहज साध्य होईल असे वाटते. परंतु प्रस्थापित व्यवस्थेकडून लाभांकित असलेल्या आणि विविध क्षेत्रात सत्तास्थानी असणाऱ्या अभिजनाकडून त्याला विरोध होण्याची शक्यता अधिक आहे. अशा परिस्थितीत सर्व विचारधारांमधून मानवीय मूल्यांना एकत्रित करून संमिश्र प्रतिमान निर्माण करण्याची गरज वाटते; ज्यात उदारमतवादातील स्वातंत्र्य, समाजवादामधील समन्वय, समता आणि गांधीवादामधील नैतिक मूल्ये असतील. सर्वोद्धारासाठी व सामर्थ्यशाली देशाच्या बांधणीसाठी असे प्रतिमान उपयुक्त ठरेल असे वाटते. जागतिकीकरणाच्या आधाराने नव्हे तर जनतेच्या आंतरिक व बाह्य क्षमता आणि शक्तींना विकसित करून महासत्तेचे स्वप्न पूर्ण होईल अशी आशा करू या.

**संदर्भ सूची :**


१) डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम, वाय. एस. राजन, (अनु)–अभय सदावर्ते (२००३) भारत २०२० : नव्या सहस्रकाचा भविष्यवेध राजहंस प्रकाशन, पुणे.

२) मा. दत्तोपंत ठेंगडी, (अनु) – बापू केंदूरकर (१९९८) "तिसऱ्या पर्यायाकडे" मोरया प्रकाशन, डोंबिवली –(प.).

३) कित्ता : (१९९८, १२६१)

४) RamMohan R. Yallapragada (२००७) India : The future Economic And knowledge Super Power? International Business & Economics Research Journal - February २००७.

५) उपरोक्त : (Feb-२००७ P-८६)

६) Dr. W. Selvamurthyu, Chief Controller Research & Development Ministry of Defence, R and D. Organisation Sena Bhawan, New Delhi INDIA : EMERGING KNOWLEDGE SUPER POWER, www.pdffactory.com

७) Prime Minister's speech at the Hindustan Times Leadership Summit in New Delhi on Nov. १७, २००६ on the subject of NEXT GLOBAL SUPER POWER.

८) Siddhartha Dash (२००५) - A Super power in Making, Orissa Review - April - २००५.

९) Assem Srivastava (२००८) Towards Corporate City states, Janta-April-२००५.

१०) सदानंद मोरे (१९९०) महात्मा फुले यांचा धर्मविचार : प्रेरणा आणि प्रभाव, समाजप्रबोधन पत्रिका, अंक ११३–१९९०.

११) डॉ. सुभाष गंगवाल (२००४) "भारत का विकास दशा एवं दिशा" मंगलदीप पब्लिकेशन, जयपूर.

१२) सुहास पळशीकर (२०८) "राजकारणाची वादप्रवणता आणि लोकसंधारणाचा प्रश्न" समाजप्रबोधन पत्रिका अंक – १८१, जानेवारी–मार्च–२००८.

१३) Anil Kumar Jain and Parul Gupta (२००८) Globalisation : The Indian Experience, Mainstream VOL XLY १ No. ८ February.

१४) कित्ता (२००८, P--१८)

१५) सम्पादकीय बजट : लोक लुभावन या लोक भुलावन, नई आजादी उद्घोष, अंक : ४ एप्रिल २००८.

१६) Human Development Report, २००६.

१७) य. दि. फडके (१९९०) 'राष्ट्रीय विकास : कोणाचा व कसा' स. प्र. प. नोव्हेंबर–डिसेंबर १९९०.

१८) प्रा. श्री. अ. दाभोलकर (२००७) सामाजिक बांधिलकी : आशयाचा शोध, नवभारत, ऑगस्ट–सप्टेंबर २००७.












राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# पर्यावरण आणि संस्कृती यांचे अनुबंध

## विश्वनाथ खैरे

मानवी संस्कृती आता पृथ्वीवरच्या पर्यावरणाला बाधा पोचवण्याच्या पातळीवर पोचली आहे याची चिंता सध्या संस्कृतीच्या विचारवंतांना लागून राहिली आहे. त्यामुळे पर्यावरणाच्या रक्षणाचाही विचार ते करीत आहेत. विविध शाखांतल्या विचारवंतांनी हा विचार करणे हे संस्कृतीच्या जागरूकतेचे लक्षण आहे. पाश्चात्त्य संस्कृतींमध्ये आहे तितकी जागरूकता आपल्याकडे दिसत नसली तरी संस्कृतीचे मराठी अभ्यासकही या विषयावर लिहीत आहेत. ज्येष्ठ पुरातत्त्वज्ञ डॉ. म. के. ढवळीकर यांचे "पर्यावरण आणि संस्कृती" (श्रीविद्या प्रकाशन २००४) हे पुस्तक त्यांच्या चाळीस वर्षांच्या पुरातत्त्वातील कार्य-चिंतनांवर आधारलेले आहे असे त्यांनी म्हटले आहे. त्यातले विवेचन मुख्यतः भारतातील संस्कृतीच्या वाटचाली-विषयी असले तरी नाईल नदीच्या पुरांचे पुरावे देऊन जागतिक हवामानातील बदलांचा संदर्भ त्यात विखुरला आहे. प्रस्तावनेनुसार "भारताच्या इतिहासातील चढ-उतार, समृद्धी आणि अवनतीचे कालखण्ड, हे पर्यावरणाच्या बदलामुळे घडून आले हे माझ्या संशोधनातून निष्पन्न झाले. त्याची मीमांसा या पुस्तकात केली आहे."

### "पर्यावरण" आणि "संस्कृती"

या ठाशीव विधानात "भारताच्या" म्हणजे "भारतातल्या संस्कृतीच्या" असा आशय आहे हे पुस्तकाच्या नावावरूनही उघड आहे. पर्यावरण आणि संस्कृती या शब्दांच्या व्याख्या (किंवा त्यातल्या संकल्पनांचे विवरण) पुस्तकाच्या आरंभीच अशा आल्या आहेत : "पर्यावरण म्हणजे पाणी, जमीन, हवामान, प्राणी आणि नैसर्गिक साधनसंपत्ती ही सारी मानवी जीवनाला आवश्यक असतात"; "पर्यावरणाशी मिळतेजुळते घेण्यासाठी मानव जे काही करतो ते म्हणजे संस्कृती" (पृ.२).

या व्याख्यांच्या आजूबाजूच्या पृ. २ व ३ वरील विवेचनात सुसंगतीचा अभाव जाणवतो. "मानवाने पर्यावरणाशी मिळतेजुळते करून घेण्यासाठी जे जे केले त्याचा अभ्यास म्हणजे सांस्कृतिक पर्यावरण" यातली शब्दयोजना गोंधळाची आहे. 'मानवाला संस्कृती असते.. याचे मुख्य कारण...आपले अन्न मिळवण्याचे ज्ञान..(जे प्राण्यांना उपजतच असते)..मानवाला शिकून घ्यावे लागते...पर्यावरणानुसार अन्नोत्पादनाची साधने निर्माण करावी लागतात' यातले संस्कृतीविषयक विधान अव्याप्तीचे आहे; तर, मानव आणि प्राणी यांच्या फरकाचे विधान चुकीचेच आहे; कारण, मानव हाही एक प्राणी आहे याचा त्यात विसर झालेला आहे.

या अफाट विश्वातल्या सूर्य या ताऱ्याभोवती फिरणारा एक ग्रह पृथ्वी. या पृथ्वीच्या पाठीवर साठ कोटी वर्षांपूर्वी सजीवांची (वनस्पती आणि प्राणी) यांची उत्पत्ती झाली असे विज्ञानातले सध्याचे मानीव आहे. या सजीवांचा जीविक विकास होत, सूक्ष्म कणापासून महावृक्षापर्यंत वनस्पती आणि अमिबापासून मानवा-पर्यंतचे प्राणी हा सजीवांचा समवाय निर्माण झाला तो, आणि पृथ्वीवरचे पाणी व खडकमातीची विविध रूपे आणि पृथ्वीला वेढून राहिलेले वातावरण या सर्वांचे मिळून झाले ते पर्यावरण. पर्यावरण ही निसर्गनिर्मिती आहे. यातील मानवसदृश जाती धरून सर्वच प्राणी उदरनिर्वाह आणि जीवनव्यवहारासाठी पूर्णपणे पर्यावरणावर अवलंबून होते. मानवसदृश जातींतून विकसित झालेल्या द्विपाद मेंदूयुक्त मानवाने मात्र मेंदूच्या उपयोगाने पर्यावरणातूनच नवी साधने बनवून आणि

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पर्यावरणातील प्राण्यांमध्ये आधी नसलेली चिन्हाधारित भाषा सिद्ध करून संस्कृतीची घडण केली. सजीवांचा विकास म्हणजेच प्राणिजातींच्या गुणधर्मांतले बदल केवळ प्रजननातून पुढच्या पिढ्यांकडे जात असतात. संस्कृती आणि तिच्यातले बदल मात्र भाषा, परंपरा वगैरे अमूर्त माध्यमांतून संक्रमित होत असतात. मानव हा मूलतः पर्यावरणाचा एक घटक : त्यामुळे त्याच्या संस्कृतीवर पर्यावरणाच्या मर्यादा असतातच. पण संस्कृतीचा परिणामही पर्यावरणावर होत असल्याने पर्यावरण आणि संस्कृती यांचे अनुबंध एकेरी नसून अनेकपदरी असतात. या व्यामिश्रतेची जाणीव न ठेवल्यामुळे पुस्तकात आणखी बरीच परस्परविसंगत आणि अशास्त्रीय म्हणता येतील अशी विधाने आली आहेत.

**मानवजातीचा इतिहास आणि काल**

उदा. पृ. ५ वर म्हटले आहे, 'पर्यावरणाचा प्रभाव मानवी शरीररचनेवरही होतो असे आता दृष्टोत्पत्तीस आले आहे.' जीवविकासाची उपपत्ती डार्विनने दीडशे वर्षांपूर्वी मांडली तिच्यात या प्रभावाचे प्रतिपादन होते; त्यामुळे 'आता' हा शब्द योग्य नाही. तेथेच पुढे म्हटले आहे, '...... आज जगभर असलेली संपूर्ण मानवजात ही साठ हजार वर्षांपूर्वी आफ्रिकेतून गेलेल्या एका काळ्या जोडप्याची संतती आहे. ही सारी पर्यावरणाची किमया आहे' (पृ.५) इथिओपियात १९८०-९० च्या दशकात सापडलेल्या सांगाड्याचा काल, लिंग, इत्यादींचा आधीच्या पुराव्यांशी मेळ घालून शास्त्रज्ञांनी अंदाज केले. ते पत्रकारांनी चटपटीत भाषेत प्रसारित केले. पत्रकारी भाषेतील विधाने येथे आणल्यामुळे, बायबलातल्या ईडनमधील ॲडॅम आणि ईव्ह यांची जागा आफ्रिकेतल्या काळ्या जोडप्याने आणि परमेश्वराची पर्यावरणाने घेतली आहे. मानवाच्या निर्मितीचा काळ बायबलवरून एका धर्मगुरूने सहा हजार वर्षे पूर्वीचा ठरवला होता. तो येथे खनित मानवजीवाश्माच्या कालमापनावरून साठ हजार वर्षे दिला आहे. या विधानाला पुस्तकातच इतरत्र छेद मिळाला आहे. पृ. १४ वर म्हटले आहे, 'भारतातील अश्मयुगीन मानव दहा लाख वर्षांपूर्वीचा आहे. त्या काळातील मानवाची कवटी अलीकडे नर्मदेच्या काठी सापडली.' किंवा पृ. १८ नुसार 'महाराष्ट्रातही सहा लाख वर्षांपूर्वी अश्मयुगीन मानवाचा वावर होता.' असे असेल तर संपूर्ण मानवजात साठ हजार वर्षांपूर्वीच्या एका जोडप्याची संतती कशी असेल?

पुस्तकातल्या कालमानांच्या नोंदींमध्ये खूपच ढिलाई दिसून येते. मानवजातीचे भूतलावरील अस्तित्व लक्ष-कोटी वर्षांच्या परिमाणाने मोजले जाते तर 'इतिहासा'च्या पुस्तकांत इ. स. आणि इ. स. पूर्व वर्षांचे आकडे वापरले जातात. रेडिओ-कार्बन पद्धतीने काढलेला काळ चाचणीच्या काळाच्या (म्हणजे आजच्या) पूर्वीचा असतो. या अनेक परिमाणांचा मिश्र वापर पुस्तकात झालेला असल्यामुळे आकलनात अडथळे येत राहतात. पृ. ११ वर रेडिओकार्बन आणि इसवी कालमानांचे एकत्रित कोष्टक आहे. त्यात ४८३०--११३० आणि ९५२०-४५३० अशा दोन नोंदी उघडच चुकीच्या आहेत. पृ. १५ वरील विभागाचा मथळा "आद्य पुराश्मयुग (१० लाख ते १,३०,००० दीड लाख वर्षे)" असा गोंधळात टाकणारा आहे. पृ. २० वरील 'उत्तर प्लायस्टोसिन काळात मध्य पुराश्मयुग अवतरले' या वाक्यात भूयुग आणि मानवयुग यांच्या कालांचे मिश्रण झाले आहे. (त्या युगांची कालमाने पुस्तकात स्पष्टपणे दिलेली नाहीत.) पृ. ३४ वर मध्याश्मयुगीन कालखंडाची सुरुवात 'सुमारे बारा-तेरा हजार वर्षांपूर्वी' आणि 'उत्खनित पुराव्याचा काल रेडिओ-कार्बन पद्धतीवरून इ. पू. ९००० ते इ. पू. ३०००' असे लागोपाठ उल्लेख आहेत, ते सुसंगत नाहीत.

नर्मदेकाठी सापडलेली कवटी 'आद्य पुराश्म कालातील' असे पृ. १४ वर म्हटले आहे. पृ.२० वर 'मध्ये पुराश्मयुग (१,३०,००० ते ३०,००० वर्षे)' असा मथळा आहे. त्या मथळ्याखाली पृ. २२ वर मात्र म्हटले आहे — 'नर्मदेच्या खोऱ्यातही मध्यपुराश्मयुगातील


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राण्यांचे जीवाश्म मोठ्या प्रमाणावर सापडले आहेत. हाथनोरा येथे सापडलेल्या मानवी कवटीचा उल्लेख वर केलाच आहे. ती अडीच ते दीड लाख वर्षांपूर्वीची असावी.'

### महत्त्वाच्या विसंगती

कालमानाशिवाय इतरही महत्त्वाच्या विधानांमध्ये विसंगती दिसून येतात. त्यांची काही ठळक उदाहरणेच खाली दिली आहेत :

पृ. ४७ – रागी आणि ज्वारी मूळ इजिप्तमधील. तेथून ती आपल्याकडे साडेचार हजार वर्षांपूर्वी आली./पृ. ३८ ('सिंधु संस्कृती' – म. के. ढवळीकर, राजहंस २००६) – रागीसुद्धा मूळची इजिप्तमधील. तिकडून आपल्याकडे आली असे तज्ज्ञांचे मत आहे. परंतु रागीची जंगली जात भारतात सापडते. इजिप्तमध्ये नाही. (रागी मूळची नेमकी कुठली याविषयी लेखकांचा निश्चय झालेला दिसत नाही.)

पृ. ७० – काश्मीर खोऱ्यात मानवी स्थिर जीवनाची सुरुवात इ. पू. २८०० च्या सुमारास झाली. काश्मीर खोऱ्यात थंडी खूप असल्यामुळे लोक जमिनीत घरे करून राहत असत./पृ. ७२ – इ. पू. ३०००–१५०० या काळात काश्मीरमध्ये हवामान उबदार होते. तेव्हा तेथे मानवी वस्ती झाली. (पर्यावरण हाच विवेचनाचा विषय असूनही हवामानाविषयी निकटची विधाने वेगवेगळी आहेत.)

पृ. ८९ – पूर्व जोर्वे काळात (इ. पू. १५००–१२००) पाऊसकाळ बरा असल्यामुळे शेतीवर जीवन अधिक अवलंबून होते. ... कडवे वाल इनामगाव येथे सापडले. ते बहुधा कोकणातून आले असावेत. कारण त्याला भरपूर पाऊस लागतो तो इनामगावला नव्हता./ पृ. १०८ – ताम्रपाषाणयुगानंतर... कोकणपट्टीत प्रथमच मानवी वसाहत झाली. (मानवी वसाहत होण्यापूर्वी हजार वर्षांच्या काळी कडवे वाल कोकणात कसे पिकले असतील?)

पृ. १४७ – (कोलीन क्लार्क यांच्या) मते इ. स. पहिल्या सहस्रकात भारताची लोकसंख्या सात कोट होती./ पृ. १५४ – इ. स. १००० च्या सुमारास भारताची लोकसंख्या सुमारे २० कोटी असल्याचा अंदाज आहे. (लोकसंख्येसारख्या महत्त्वाच्या आकड्यांतही इतकी तफावत असणे योग्य नाही.)

पृ. ५६ – मोहेंजोदारो येथे सिंधू नदीचा प्रवाह भूकंपामुळे खुंटला आणि पुराचे पाणी मागे जाऊ लागले. त्यामुळे त्या शहराला अवकळा प्राप्त झाली./ पृ. ८६ – भूकंपामुळे मोहेंजोदारोच्या दक्षिणेस सुमारे १५० कि.मी.वर सेहवानजवळ सिंधूचे पात्र उंचावले गेले असावे. त्यामुळे नदीचे पाणी मोहेंजोदारो शहरात शिरले. (दोन जागी इतके वेगळे उल्लेख असणे शास्त्रीय लेखनात योग्य नाही. शहराजवळ आणि दीडशे मैलांवर पाणी अडण्याचे परिणाम अगदी वेगळे होतात.)

पृ. ८४ – (माळवा संस्कृतीतल्या नावडातोडीच्या) चौकोनी घरांचा साधारण आकार ३.५० x २.५० मी, व गोल घरांचा व्यास ३ मी. होता./ पृ. ८७ – माळवा संस्कृतीची घरे चौकोनी आकाराची असून ओळीत बांधलेली असत. ती आकाराने थोडी मोठी (७ x ५मी.) असत. त्यात मध्यभागी एक लहान भिंत घालून त्याचे दोन भाग केलेले असत. (येथेही मापांचा गोंधळ आहे. ७ x ५मी. आकाराच्या चौकोनात ३.५० x २.५० मी. मापाची चार घरे बसतील आणि त्यासाठी दोन भिंती घालाव्या लागतील.)

### मुख्य प्रमेय असद्धि

भारतात झालेल्या पुरातत्त्वी खनितांवरून त्या त्या काळचे पर्यावरण आणि संस्कृती यांविषयी संशोधकांनी जे तपशील दिले किंवा निष्कर्ष काढले ते पुस्तकात सारांशाने देतानासुद्धा अशा गफलती झाल्या आहेत. मग पर्यावरणावर संस्कृती (सर्वस्वी) अवलंबून असते किंवा पर्यावरणाच्या बदलांनुसार संस्कृतीत बदल होतात असे जे पुस्तकाचे प्रमुख प्रमेय आहे ते सिद्ध होईल अशा प्रकारचे संगतवार विवेचन किंवा ठोस पुरावे पुस्तकात मिळत नाहीत यात नवल नाही.









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रतिकूल पर्यावरणामुळे वस्त्या किंवा वसाहती हलल्या किंवा नाहीशा झाल्या याची उदाहरणे पुस्तकात दिलेली आहेत. पण या प्रकारची स्थलांतरे सर्वच सजीवांची होत असतात हे निसर्गात दिसतच असते. उदा. पक्ष्यांचे प्रचंड कळप हजारो किलोमीटरची अंतरे आकाशमार्गाने पार करून अनुकूल पर्यावरणांच्या प्रदेशाकडे दरसाल जातयेत असतात. त्याचप्रमाणे दुष्काळामुळे वस्त्या सोडून गेलेले मानवसमाज, थोड्या काळात पर्यावरणात सुधारणा झाली तर परत त्या जागी येतात, ही मानवाची निसर्गप्राप्त प्राणिबुद्धी म्हणता येईल. अधिक कालांतराने ते समाज पहिल्या जागी येऊन किंवा परस्थ होऊनही आधीच्या पिढ्यांच्या संस्कृतिसंचितांचा व्यवहार करू लागतात ही मानवाची खास क्षमता आहे. ही खास क्षमता मुख्यतः लक्षावधी वर्षांच्या कालावधीत विकसित होत आलेल्या मानवी मेंदूची असते. तीच मानवी संस्कृतीच्या उदयाच्या आणि प्रगतीच्या मुळाशी आहे. तिच्या साह्याने मानवसमाज जी वस्तुमय संस्कृती निर्माण करतो ती पर्यावरणाशी मेळ ठेवणारी किंवा पर्यावरणात आपल्याला अनुकूल असा अवकाश निर्माण करणारी असावीच लागते. तिच्याबरोबर जी मानसिक संस्कृती तो समाज सिद्ध करतो ती पर्यावरणावर अवलंबून नसते; त्याचमुळे समान पर्यावरणाच्या वेगवेगळ्या भूभागांवर नांदणाऱ्या संस्कृती वेगळ्या असू शकतात. मानवी मेंदूच्या स्मरणशक्तीमुळे आणि संकल्पनाशक्तीतून निर्मिलेल्या भाषेमुळे ही मानसिक संस्कृती पुढच्या पिढ्यांकडे अशरीरी माध्यमातून (शरीरातील जनुकांच्या मार्गाने नव्हे) संक्रमित होत असते.

ही मानसिक संस्कृती पर्यावरणाच्या अनेक स्थित्यंतरांमध्ये टिकून राहिल्याची उदाहरणे पुस्तकातच आली आहेत. पृ. २७ वर उत्तर पुराश्मयुगातली माहिती दिली आहे — चाळीस ते पंचवीस हजार वर्षांपूर्वी महाराष्ट्र, राजस्थान, मध्यप्रदेश आणि उत्तर प्रदेशांमध्ये शहामृग या वाळवंटी पक्ष्याचा वावर होण्याइतके हवामान शुष्क होते. खनितांमध्ये त्या काळातल्या मानवी वसाहती फारशा किंवा राजस्थानात मुळीच सापडलेल्या नाहीत (पृ. २५). त्या काळातली माणसे शिलाश्रयी म्हणजे गुहांमध्ये राहत होती असे संकीर्ण उल्लेख पुस्तकात आहेत. हा पर्यावरणाचा भौतिक परिणाम होता.

पण पृ. २७ वरचाच "मध्य प्रदेशातील शिलाश्रयांच्या चित्रातही हा पक्षी (शहामृग) चितारलेला आहे (आ. ८)" हा उल्लेख मानसिक संस्कृतीच्या संदर्भात महत्त्वाचा आहे आणि तो पुस्तकाच्या प्रमेयाला छेद देणारा आहे. आधीच्या मध्यपुराश्मयुगात पाऊस चांगला असल्यामुळे नदीकाठच्या भागातच त्या काळातली छोटी दगडी हत्यारे सापडली (पृ. २३) म्हणजे वस्त्या तेथेच होत्या. त्या ठिकाणी हवामान शुष्क झाल्यावर माणसे गुहांच्या आश्रयाला गेली. परंतु आधीच्या अनुकूल पर्यावरणात त्यांनी जे केले नव्हते ते या प्रतिकूल पर्यावरणाच्या युगात केले : गुहांमध्ये खडकांचा पक्का पृष्ठभाग सापडला, डोंगरकुशीत रंगीत माती मिळाल्या, या नव्या पर्यावरणाचा फायदा घेऊन मेंदूने संकल्पना, चिन्हे इत्यादी नवी अमूर्त, आणि हातांनी त्रिमिती प्राण्यांच्या द्विमिती चित्रांची मूर्त निर्मिती करून त्या 'प्रतिकूल' पर्यावरणावर संस्कृतीचा कायमचा ठसा उमटवला. सखल प्रदेशातल्या वस्त्या उजाड झाल्या, लोकसंख्या कमी झाली; तरी शिलाश्रयी होऊनही संस्कृती मात्र पुढेच गेली.

### पर्यावरणावर संस्कृतीची मात

त्याच पानावरच्या पुढच्या परिच्छेदात दिलेले उदाहरण आणखी बोलके आहे. खनितात उत्तर पुराश्मयुगी दगडी हत्यारांबरोबर नैसर्गिक रंगीत पट्ट्यांचे एकाभोवती एक त्रिकोण दाखवणारा, तळहातावर राहण्याएवढा दगड एका दगडी ओट्यावर मिळाला. 'अशा प्रकारची नक्षी असलेल्या दगडाची आजही तेथील गावकरी पूजा करतात. ती त्यांची लोकदेवता आहे. तिला ते कढाई-की-देवी म्हणतात. तिचे ठाणे खनितापासून एक कि.मी. अंतरावर आहे. अगारिया गोंड जमातीचे लोक अशा दगडाची अंगारमाता म्हणून









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पूजा करतात. त्या भागातील कोल, बैगा या शिकारजीवी जमातीही अशा दगडांना माता समजतात.' (पृ. २७–२८)

या सगळ्या निरीक्षणांवरून एकाच आशयाची दोन विधाने केलेली आहेत : "यावरून वीस–पंचवीस हजार वर्षांपूर्वीचा मानव बहुधा अशा दगडाला देवी समजत असावा असे म्हणता येईल. भारतात अतिप्राचीन परंपरा हजारो वर्षे कशा टिकून आहेत याचे हे उत्तम उदाहरण आहे" (पृ. २८). खनिताच्या अहवालात ही विधाने ठीक आहेत. 'पर्यावरण आणि संस्कृती' या प्रतिपाद्य विषयाच्या अनुरोधाने त्यांचा विचार पुस्तकात झालेला नाही.

या उत्तर पुराश्मयुगाचा अस्त 'सुमारे पंधरा हजार वर्षांपूर्वी झाला. याचे मुख्य कारण म्हणजे पर्यावरणातील विलक्षण बदल.' नंतर तेरा ते सहा हजार वर्षांपूर्वीच्या काळातले 'मध्याश्मयुग हे मानवी इतिहासातील अत्यंत समृद्ध युग होते.' या युगात शेतीची सुरुवात झाली. तीन ते अडीच हजार वर्षांपूर्वीचे नवाश्मयुग, नंतर अडीच ते दोन हजार वर्षांपूर्वीचे उत्तर नवाश्मयुग इत्यादी युगांतरे अशीच पर्यावरणातल्या कमीअधिक बदलांमुळेच झाली असा दावा पुस्तकात जागोजागी केला आहे. त्यानंतरच्या म्हणजे 'इतिहासकाळा'तल्या दुष्काळांवर सबंध प्रकरणच लिहिलेले आहे. पर्यावरणात इतकी स्थित्यंतरे वारंवार झाली तरीसुद्धा संस्कृती नामक तत्त्वाचा माणसाच्या माणूसपणाच्या अंतरंगातला एक पायाभूत आधार, दगडाच्या देवतेच्या रूपाने, त्या सर्वांवर मात करून टिकलेला आहे ही वस्तुस्थिती पर्यावरण आणि संस्कृती यांच्या अनुबंधावर पुस्तकातल्या भाष्यांपेक्षा वेगळाच प्रकाश टाकते.

पृ. ९३ वर इनामगावच्या खनितात सापडलेल्या मातृदेवतेची माहिती आहे, तीही अशीच आहे. त्या देवतेच्या कच्च्या मातीच्या मूर्ती इ. पू. १४०० च्या सापडल्या. 'महाभारतात विशिरा ही देवता उल्लेखित आहे. शिरोहीन देवतांची इतिहासकालीन शिल्पे सापडतात. महाराष्ट्रातील काही आदिवासी जमातीही त्यांची पूजा करतात.' इ. पू. १४०० पासून पर्यावरणात अनेक स्थित्यंतरे झाली तरी ही देवता संस्कृतीत टिकून राहिली. मानसिक संस्कृती पर्यावरणावर मात करते असेच या उदाहरणांवरून म्हणता येईल.

**साहित्यातल्या आधारांची चिकित्सा**

'इ. पू. १२००–७०० या काळात युरोपात खूप थंडी होती. अशा वेळी विषुववृत्तीय प्रदेशात दुष्काळ पडतात. यावरून आपल्याकडे इ. पू. १२००–६०० या काळात भयानक दुष्काळ वारंवार पडत होते' असा निष्कर्ष पृ. ९५ वर काढला आहे. उत्तर आणि दक्षिण १० अक्षांशांच्या पट्ट्याला विषुववृत्तीय प्रदेश म्हणतात, भारत त्यात पडत नाही हे या वर्णनात लक्षात घेतलेले नाही.

'महाभारताचा काळ इ. पू. १२००–६०० असा समजला जातो. त्यातील १२.१३९.१३–२१ या उल्लेखावरून त्या काळी वारंवार दुष्काळ पडत होते असे वाटते' असा सानुवाद संदर्भ पुष्टीसाठी पृ. ९५ वर दिला आहे. संदर्भातला दुष्काळ 'त्रेता आणि द्वापार युगांच्या संधिकालात' पडला असल्यामुळे इ. पू. १२००–६०० या काळाला लागू पडणार नाही. महाभारताचा काळ म्हणजे कौरवपांडव या ऐतिहासिक व्यक्ती मानून त्यांचा आणि त्यांच्या वंशजांचा काळ असे धरलेले दिसते. पुढे पृ. १४४ वर म्हटले आहे – "महाभारतात आणि पुराणात या काळाला (इ.स.६००–१०००) कलियुग म्हटलेले आहे. दक्षिण भारतातील अनेक शिलालेखांत या कलियुगाचा उल्लेख आढळतो." पुस्तकातील कृतादी युगे आणि इसवी सन यांच्या गल्लतीवरून, महाभारताच्या काळासंबंधी बराच गोंधळ असल्याचे दिसते.

म. भा. १२.१३९ या अध्यायातले दुष्काळाचे वर्णन कौरवपांडवांच्या चरित्राच्या काळातले नाही. "युधिष्ठिराने भीष्माला विचारले, 'पाऊस पडला नाही... तर ब्राह्मणाने कसे जगावे आणि राजाने कसे वागावे?'



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

(१३९.५,६). भीष्म म्हणाला, 'योगक्षेम आणि सुवृष्टी यांचे, तसेच कृत-त्रेता-द्वापर-कलि या युगांचे मूळ राजा असतो. त्यामुळे अवकाळ आला असता विज्ञानबलाचा आधार घेऊन जगले पाहिजे. याविषयी पुरातन इतिहास सांगतात. विश्वामित्र आणि चांडाळ यांचा चांडाळाच्या झोपडीत याविषयी संवाद झाला होता" (१३९.९-१२). यानंतर त्या दुष्काळाचे वर्णन झाल्यावर सांगितले आहे की, भुकेच्या पोटी विश्वामित्र चांडाळाच्या झोपडीतील कुत्र्याच्या जांघेचे मास ओढीत असताना चांडाळाने त्याला हटकले. तेव्हा विश्वामित्र म्हणाला, 'मी जीवितासाठी बुद्धिपूर्वक अभक्ष्य भक्षण करणार आहे त्याला तू मान्यता दे' (१३९.४७,६२). ही धर्माधर्माची चर्चा पुढेही चालली आहे कारण एकूण कथेचा उद्देशच तो आहे, भीष्माने किंवा कवीने स्वतः पाहिलेल्या दुष्काळाचे वर्णन करण्याचा नाही. जे वर्णन आहे ते ठरीव ठशाचे आहे.

पृ. ९६ वर "यास्कसुद्धा आपल्या निरुक्तात (१,२,३,४०) एका बारा वर्षे पडलेल्या दुष्काळाचा उल्लेख करतो" याचा 'सज्जड पुराव्या'त समावेश केला आहे. (संदर्भांक १.२.३.१० हवा.) यास्काने दिलेला 'इतिहास' असा : "ऋष्टिषेणाचा पुत्र देवापि आणि कौरवकुलातला शन्तनु हे भाऊ होते. धाकट्या शन्तनूने अभिषेक करवून घेतला. देवापि तप करायला निघून गेला. पुढे शन्तनूच्या राज्यात बारा वर्षे देवाने पाऊस पाडला नाही. ब्राह्मण म्हणाले, 'तू अधर्माचरण केलेस. थोरल्या भावाला अंतर देऊन अभिषेक करून घेतलास. त्यामुळे देव पाऊस पाडीत नाही.' त्या शन्तनूने देवापीला राज्य देऊ केले. त्याला देवापी म्हणाला, 'तुझा पुरोहित होईन. तुझ्यासाठी यज्ञ करीन.' त्याचे हे पावसाच्या आळवणीचे सूक्त आहे. त्याची ही ऋचा आहे." ही ऋचा १०.९८.५ या क्रमांकाची आहे. म्हणजे यास्काने वेदातल्या ऋचेची पूर्वकथा सांगितली. याचा अर्थ ती महाभारतकाळाच्या खूपच पूर्वीची म्हणावी लागेल. त्याशिवाय, अनावृष्टीचे कारण राजाचे अधर्माचरण हे सांगितले आहे. सूक्त आणि निरुक्त दोन्ही आधिदैविक पातळीवरची आहेत. केवळ अवर्षणाचा उल्लेख आला म्हणून ते पर्यावरणाचे अमुक काळातील उल्लेख असे म्हणता येणार नाही. इतिहास नसलेल्या ग्रंथांमधले असले निरे उल्लेख दुष्काळाला आधार म्हणून घ्यायचे म्हटले तर त्याच ग्रंथांतले 'त्या धर्मनिष्ठ राजाच्या देशात पाऊसपाणी वेळच्यावेळी पडत होते' या स्वरूपाचे उल्लेख त्याच काळातल्या अनुकूल पर्यावरणाचे म्हणावे लागतील.

पृ. १३९ वरील दण्डीच्या दशकुमारचरितातला उतारा इसवी सातव्या-आठव्या शतकातील दुष्काळाचा पुरावा म्हणून दिला आहे, त्याला वरचेच आक्षेप लागू होतात. (पुस्तकात त्याच्या आश्रयदात्या पल्लव राजाचा काळ इ.पू.६७०-७०० पडला आहे.) "ते इतके भयानक आहे की, त्याने तो दुष्काळ प्रत्यक्ष पाहिलेला असावा असे वाटते" असा वर्णन-दर्शन संबंध जोडणे योग्य नाही. ते वर्णन महाभारतातल्यासारखेच आहे.

ते वर्णन 'दशकुमार'च्या सहाव्या उच्छ्वासात मित्रगुप्त या कुमाराच्या कथनातील त्याने त्याला हटकणाऱ्या ब्रह्मराक्षसाला सांगितलेल्या गोष्टीत आले आहे. त्या गोष्टीच्या कथनात मित्रगुप्त सांगतो, "मी त्याला म्हणालो, 'बाबारे, मी ब्राह्मण आहे. शत्रूच्या हाताने समुद्रात, समुद्रातून यवनांच्या नावेत, नावेतून या रंगीबेरंगी खडकांच्या या थोर पर्वतावर आलेला मी योगायोगाने या तळ्यावर विसावलो आहे.' तो म्हणाला, माझ्या प्रश्नांची उत्तरे दिली नाहीस तर तुला खातो.' मग आर्यावृत्तात आमचा संवाद झाला. 'क्रूर काय? स्त्रीहृदय: हितकर काय घरा? गुण स्त्रीचे। काम कोण? संकल्प; दुष्करसाधन? होय प्रज्ञेचे। याला प्रमाण धूमिनी, गोमिनी निम्बवती नितम्बवती यांचे'. मग मी धूमिनीची गोष्ट सांगितली. त्रिगर्त नावाचे जनपद आहे." या सुरुवातीवरून गोष्टीचे स्वरूप आणि तिचे प्रयोजन रंजनाचे असल्याचे आपल्याला कळते. त्या रंजनाला स्त्रीद्वेषाची रुंद किनार आहे. त्या दृष्टीने, पृ. १३२ वरील उताऱ्यात दोन वाक्ये चुकीची उतरली आहेत – 'पुढे एकदा धान्यक बाहेर गेला असताना त्याला धान्यकाच्या








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पत्नीचा भोग घेण्याची इच्छा झाली. तिने पुष्कळ प्रतिकार केला, पण त्याने आपली इच्छा पूर्ण केली.' ही वाक्ये मुळात अशी आहेत : "पुष्टं च तमुद्रिक्तधातुमेकदा मृगान्वेषणाय च प्रयाते धन्यके सा धूमिनी रिरंसयोपातिष्ठत्। मर्त्सितापि तेन बलात्कार-मरीरमत्। जब वह तगडा हो गया और उसके धातुओं मे वृद्धि हो गई तब एक बार जब धन्यक पशु की खोज में चला गया था, उसके पास वह धूमिनी रमण की इच्छा से उपस्थित हुई। उसके द्वारा डाँटी जाने पर भी उसने जबर्दस्ती रमण किया।" (दशकुमारचरितम् टीकाकार – - विश्वनाथ झा. मोतीलाल बनारसीदास १९९३ पृ. १८४).

म्हणून या उताऱ्याचा पुरावा दुष्काळाच्या संदर्भात देता येणार नाही. 'अस्ति त्रिगर्तो नाम जनपदः।' हे वाक्य 'एक होता राजा'च्या धर्तीचे, गोष्टीच्या पारंपरिक आरंभाचे आहे, भौगोलिक वर्णनाचे नाही. त्रिगर्तात भयानक दुष्काळ म्हटला तरीही जंगलात धन्यकाला 'कन्दमूलमृगबहुल' गहन देश सापडला, विहिरीत पाणी होते अशीही वर्णने त्याच वृत्तात आहेत. 'लोकांच्या मदतीने आणि अवन्तीच्या राजाच्या कृपेने ती ऐषारामात राहू लागली' असे त्यातच आले आहे. त्यामुळे, "त्याने वर्णिलेला दुष्काळ उत्तरेतील 'त्रिगर्त' देशात पडला होता. परंतु त्याचा परिणाम इतरत्र झाला होता असे दण्डिन् म्हणतो" या विधानाला मुळात काहीही आधार मिळू शकत नाही.

### प्रगत तंत्रज्ञान

पृ. १०५ वर शृंगवेरपूर येथील इ.पू. दुसऱ्या शतकातील 'तलावा'चे म्हणून दिलेले वर्णन जमिनीत बांधलेल्या पक्क्या विटांच्या टाक्यांचे आहे. सर्वात मोठ्या टाकीची मापे '२३.३० x १२.४५ x ३.८० मी. खोल' अशी दिली आहेत. काठोकाठ भरली तर तिची क्षमता १२ लाख लीटर होते. पुस्तकात ती ६५ लाख लीटर दिली आहे. येथे मापांचा घोटाळा झाला आहे. 'गावाचे गंगेच्या पुरापासून रक्षण व्हावे म्हणून तो बांधला होता यात शंका नाही' असे तिसऱ्या ओळीत म्हटले आहे. 'तेथील गावाला वर्षभर पुरण्याइतके पाणी या तलावात होते.' या सोळाव्या ओळीतील वाक्यावरून या टाक्यांचा खरा उपयोग स्पष्ट होतो. एवढ्याशा टाक्यांनी गावाचे गंगेच्या पुरापासून रक्षण होणे शक्य नव्हते. एवढे कुशल काम करवणाऱ्या या गावाची लोकवस्ती काही हजार नक्कीच असेल. तिला टाक्यांमधल्या एका वेळच्या साठ्याचे पाणी वर्षभर पुरणे शक्य नव्हते. नदीच्या पाण्यातला गाळ खाली बसवून पिण्याचे स्वच्छ पाणी मिळावे हाच त्याचा उद्देश असला पाहिजे.

या कामातल्या तंत्रज्ञानाची रास्त भलावण पृ. १०५ वर केली आहे. त्याच्या तुलनेत पृ. १३५ वरील 'भाकिता'संबंधीची विधाने घोटाळ्याची आहेत. इ. स. ४००–१००० या काळातील 'दुष्काळाच्या संकटाचे भाकित वराहमिहिराने केले ते किती तंतोतंत -अचूक ठरले याला पुरावा ह्युएनत्संग चा' असे परिच्छेदाच्या आरंभी म्हटले आहे. भाकिताला आधार बृहत्संहितेत दिलेल्या ग्रहस्थितींचा नोंदला आहे. परिच्छेदाच्या शेवटी मात्र म्हटले आहे, "वराहमिहिराने जरी भविष्य वर्तविलेले असले तरी त्या काळी प्रत्यक्ष ग्रहांची अशी युती झाली होती काय हे तपासून पाहणे आवश्यक आहे. तसे असल्यास त्याचे भाकित खरे ठरले असे म्हणता येईल." आधीचे भाकिताविषयीचे विधान अतिव्याप्त आणि चुकीचे आहे. कारण, वराहमिहिराने भाकित असे केलेले नाही. नंतरचे विधान शास्त्राच्या शिस्तीला धरून वाटले तरी गैरलागू आहे, कारण पर्यावरण–संस्कृतींच्या संबंधात फलज्योतिषातल्या शर्तींचे पडताळे पाहणे पर्यावरणाच्या शास्त्रात बसत नाही.

### परस्परविसंगत विधाने

या प्रकारची परस्परविसंगत विधाने संस्कृतिवर्णनातही आली आहेत. इ. स. ६००–१००० या काळात हलाखीच्या परिस्थितीमुळे शाकंभरी ही नवी देवता निर्माण झाली असे पृ. १३७ वर सूचित केले आहे. पण पुढे पृ. १४२ पर्यंतच्या विवेचनात तिच्यासारख्या


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शिरोहीन देवतेची प्रागैतिहासिक काळापर्यंत मागे जाणारी उदाहरणे दिली आहेत.

'दुर्गादेवीचा' दुष्काळ इ. स. १३९६–१४०८ या काळात सतत पडत होता (पृ. १५३) दुर्गाडीचा दुष्काळ हे नाव अधिक अन्वर्थक वाटते (पृ. १५४). पण इ. स. ६००–१००० या काळासंबंधीच्या प्रकरणाचे नाव 'दुर्गादेवीचे दुष्काळ' असे आहे (पृ. १३७–१५१). हा कालविसंगतीचा प्रकार आहे.

"इ. स. १६३० मध्ये 'अल् निनो' (महासागरी जलप्रवाह) अत्यंत प्रबळ होता. खरे म्हणजे या वर्षी शिवाजीराजांचा जन्म झाला." (पृ. १५६) यातल्या उभयान्वयी शब्दप्रयोगाचे काही प्रयोजन नाही कारण, या दोन घटनांचा एकमेकांशी काहीच संबंध नाही.

"इ. पू. दुसऱ्या सहस्रकात, जेव्हा पर्यावरण अत्यंत प्रतिकूल होते तेव्हा वैदिक वाङ्मयाची निर्मिती झाली" (पृ. १७१). याच परिच्छेदात पुढे, हा काळ इ. पू. २०००–५०० असा दिला आहे. "प्रतिकूल पर्यावरणात धर्मप्रवणता वाढीस लागते असे म्हणणे चूक ठरणार नाही" हा त्यातल्या शेवटच्या वाक्यातला व्यापक निष्कर्ष चूक ठरण्यासारखा आहे. वैदिक वाङ्मय हे जीवनाबाबत खूप उत्साही आहे असे सांगितले जाते, ते 'प्रतिकूल पर्यावरणात' निर्माण झाले. 'साम्राज्यकाळ' या प्रकरणात इ. पू. ५०० ते इ. स. ५०० हा काळ समृद्धीचा होता असे सांगितले आहे. बौद्ध आणि जैन या दोन धर्मपंथांची उभारणी या 'अनुकूल पर्यावरणाच्या' काळात झाली आणि त्यांचा जीवनविचार वैदिकांपेक्षा खूपच वेगळा आहे या वस्तुस्थितीचे भान राखलेले नाही.

### खेदजनक शास्त्रीय लेखन

पुस्तकाचे शेवटचे अधिकरण 'एकविसावे शतक' या मथळ्याचे आहे. प्रस्तावनेत आणि पहिल्या प्रकरणाच्या आरंभी आलेली विधाने येथे पुन्हा आली आहेत. तंत्रज्ञान कितीही प्रगत झाले तरी पर्यावरणाच्या ऱ्हासापुढे संस्कृतीचा टिकाव लागणे कठीण आहे असा एकूण सूर आहे. शेवट असा आहे : "परंतु त्यातही आपल्याला एक आशेचा किरण दिसतो. पृथ्वीचे तापमान वाढते आहे. त्यामुळे २१ व्या शतकात आपल्याकडे चांगला पाऊस पडेल असे शास्त्रज्ञ सांगतात. गेली बारा वर्षे सतत आपल्याकडे चांगला पाऊस पडतो आहे हे या संदर्भात ध्यानात ठेवणे आवश्यक आहे." (पृ. १७२)

भारतातल्या संस्कृतीचे भवितव्य २१ व्या शतकातही पूर्णपणे पावसावर अवलंबून आहे असे येथे मानले आहे. हे फारच एकांगी आहे. संगणक आणि उपग्रह यांच्यातून होणाऱ्या दळणवळणाने पृथ्वीवरचे सारे लोक जवळ आले आहेत. संस्कृतीची प्रगती इतकी झाली आहे की, अवघ्या पृथ्वीच्या पर्यावरणाचा विचार करण्यासाठी सारे देश एकत्र येत आहेत. भविष्यकाळातील धोक्यांचा वेध घेऊन प्रतिरोधक उपायांची योजना करण्याचे प्रयत्न चालू होत आहेत. पर्यावरणावर मात करण्यासाठी संस्कृतीचा उदय झाला. आता तीच संस्कृती (स्वार्थासाठी का होईना) पर्यावरणाचे रक्षण करण्याचा सामुदायिक विचार करू लागली आहे. संस्कृती आणि पर्यावरण यापुढे हातात हात घालून कालक्रमणा करतील अशी सुचिन्हे दिसत आहेत. त्या सर्वांची दखल घेतल्याशिवाय पर्यावरण आणि संस्कृती यांच्या अनुबंधाचा विचार खोलवर झाला आहे असे म्हणता येणार नाही.

सबंध पुस्तकातच खोलवर विचाराचा अभाव जाणवतो. तपशिलांची विधाने पुरेशा गंभीरपणाने आणि काळजीने केलेली नाहीत. पुरातत्त्वासारख्या संबद्ध शास्त्राचे तज्ज्ञ, शिक्षणक्षेत्रातले मान्यवर लेखक सोप्या मराठी भाषेत मध्यम आकाराचे पुस्तक लिहितात ते पाठ्यपुस्तक होत असे. पुढच्या पिढीचे बौद्धिक भरणपोषण अशा लेखनावर होणे ही एकंदर मराठी समाजाच्या दृष्टीनेच दुर्दैवाची गोष्ट आहे.






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई



# काल, आज आणि उद्या
## एक विषण्ण शेवट
साक्षी

दोन वर्षांपूर्वी ऑक्टोबर महिन्यात इंफाळला जाण्याचा योग आला. पण आम्ही इंफाळला गेलो तो दिवस चांगला लागला नाही. आमची बस इंफाळला जात असताना, मधूनमधून रस्त्याच्या कडेला माणसांचे जमाव निदर्शने करताना दिसत होते. 'मणिपूरमध्ये' भारतीय लष्कर ठेवले आहे, ते काढून घ्या,' अशी त्यांची मागणी होती. काही ठिकाणी तर शाळेतली कुमारवयातली मुलेमुली, लष्कराने केलेल्या गोळीबारात एका मुलीच्या झालेल्या मरणा-बद्दल निषेधाच्या घोषणा देत होती. आम्ही इंफाळमध्ये पोचल्यावर, आम्ही ज्या अतिथिगृहात उतरलो होतो तेथील व्यवस्थापकाने सांगितले की, "परवाच्या दिवशी लष्करी अत्याचाराचा धिक्कार करणारा बंद मणिपूरभर पाळला जाणार आहे; त्यानंतरच्या दिवशी, राष्ट्रपती इंफाळमध्ये येणार आहेत व त्यांच्या लक्षात मणिपूरवासियांची दुरवस्था यावी म्हणून पुनः हरताळ होणार आहे. हे दोन दिवस अतिथिगृह कोणतीच सेवा पुरवू शकणार नाही. तेव्हा तुम्ही उद्याच इथून जावे हे बरे !"

आम्ही संध्याकाळी इंफाळमध्ये फिरण्यासाठी बाहेर पडलो. दुसऱ्या महायुद्धात इंफाळ व कोहिमा (नागालँडची राजधानी) यांच्या परिसरात ब्रिटिश सैन्य व जपानी सैन्य यांच्यात निकराच्या लढाया झाल्या होत्या व त्यात जपानी सैन्याला माघार घ्यावी लागली होती. या लढायात जे ब्रिटिश जवान व अधिकारी मारले गेले त्यांची प्रेते एकत्र आणून विस्तृत स्मशानात पुरण्यात आली. कोहिमा व इंफाळ या दोन्ही ठिकाणी ही स्मशाने आहेत. उत्कृष्ट हिरवळ व त्यात ठेवलेल्या शिळा असे स्मशानाचे रूप आहे. या शिळांवर युद्धात कामी आलेल्या जवानाचे नाव, सैन्य-पथक, मूळ गाव आणि वय यांची नोंद केलेली आहे. हे सैनिक कोणी १८ वर्षांचे, कोणी २० वर्षांचे, कोणी पंचविशीतले असे होते. स्कॉटलंड, इंग्लंड, ऑस्ट्रेलिया, कॅनडा इतक्या लांब लांबच्या भागातून हजारो मैलांचा प्रवास करून ते इंफाळ सारख्या अडचणीच्या ठिकाणी जपान्यांशी लढायला आले व लढता लढता मरून गेले. बरे, ते ज्यांच्याशी लढत होते ते जपानी लष्करही थायलंड, मलाया, ब्रह्मदेश असे देश काबीज करीत हजारो मैलांचे अंतर तुडवून आले होते. जपानी बिचारे हरले होते. त्यांचे नाव-निशाण उरले नव्हते. विजयी ब्रिटिश सैन्याने आपल्या मृतांचे स्मारक स्मशानाच्या रूपाने केले होते व आजही त्याचे जतन करीत होते. स्वच्छ, शांत, हिरवागार विस्तार असणारे स्मशान !

आम्ही अतिथिगृहात आलो तो व्यवस्थापक म्हणाला, "आनंदाची बातमी आहे ! इंफाळहून गुवाहाटीला जाणाऱ्या बसेस सकाळी सुटतात. पण परवा-तेरवाचा बंद लक्षात घेऊन उद्या संध्याकाळी एक बस सोडणार आहेत. मी त्या बसमध्ये तुमच्यासाठी जागा राखून ठेवल्या आहेत !" मी म्हणालो, "फार छान ! उद्या सकाळी तरी हिंडायला सवड आहे. काय हो, इथे सुभाषचंद्र आले होते, त्या ठिकाणी जाता येईल का ?" मोईरांगला ना? इथून ५० कि.मी. अंतरावर आहे, ते. टॅक्सीने ३ तास जाऊन-येऊन लागतील."

दुसऱ्या दिवशी सकाळी आम्ही टॅक्सीने मोईरांगला गेलो. ईशान्य भारतातील अतिरम्य वनश्री पाहायला मिळाली. नागमोडी रस्ता डोंगर चढत-उतरत जात होता. दोन्ही बाजूला उंच उंच वृक्ष, बांबूची दाट व झुलती वने, त्यांच्या पायाशी वेली, गवत यांचे गचपण, सुखद-शीतल वारा असा सगळा मन सुखवून टाकणारा माहोल होता. दोन तासांनी आम्ही मोईरांगला पोचलो. ईशान्य भारतात आढळणाऱ्या वरकड खेड्यांसारखेच ते



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई





एक रस्त्याच्या दोन्ही बाजूला ओळीने कुडाच्या झोपड्या व त्यांना बांबूंची रेखीव कुंपणे यांनी बनलेले, खेडे होते. खेडे पार करून गेल्यावर तेथे एक बारकी शाळेसारखी इमारत दिसली. हे होते त्या लोक-विलक्षण घटनेचे स्मारक! सुभाषचंद्र इथे १४ एप्रिल १९४४ या दिवशी आले होते. त्यांनी याच ठिकाणी स्वतंत्र हिंदुस्थानाचा तिरंगी राष्ट्रध्वज फडकावला होता! त्या ध्वजाला व सुभाषचंद्रांना आझाद हिंद फौजेने (इंडियन नॅशनल आर्मी) मानवंदना दिली होती! त्या प्रसंगाची हकीकत सांगणारा शिलालेख तेथल्या ध्वजस्तंभाच्या पायगती कोरलेला होता. खरोखर, तो दिवस सुवर्णाक्षरांनी लिहावा असा होता. सुभाषचंद्रांनी पराक्रमाचा परमोत्कर्ष गाठला होता.

(१)

२६ जानेवारी १९४१ रोजी सुभाषचंद्र कलकत्त्याच्या त्यांच्या घरात नजरकैदेत असताना पोलिसांची नजर चुकवून निसटले. मार्च १९४१ मध्ये (त्या वेळच्या) सोव्हिएट युनियनमध्ये पोचले व मे १९४१ मध्ये बर्लिनला गेले. एक वर्षाहून जास्त काळ बोसांनी जर्मनीत घालविला. ते दिवस त्यांच्या दृष्टीने अतिशय मनस्तापाचे गेले असले पाहिजेत. पण १९४३ च्या सुरुवातीला संधी चालून आली. जपानकडून सुभाषचंद्रांना बोलावले आले. जर्मन आरमार आणि जपानी आरमार यांनी परस्पर सहकार्याने सुभाषचंद्रांना जपानात नेण्याची उत्कृष्ट योजना तयार केली. पण प्रवास अतिशय धोक्याचा व खडतर होता. जपानी आरमाराची एक यू-बोट सुभाषचंद्र व त्यांचे दोन सहकारी-अबीद हसन व स्वामी यांना घेऊन इंग्रजी खाडी, बिस्केचा उपसागर (स्पेनच्या उत्तरेला असणारा समुद्र), आफ्रिकेचा पश्चिम किनारा या मार्गाने दक्षिण आफ्रिकेला वळसा घालून मादागास्कर बेटाच्या दक्षिणेच्या टोकाला आली. तेथे सुभाषचंद्र व त्यांचे सहकारी यू-बोटीतून उतरून जपानी पाणबुडीत शिरले. हे पाणबुड्या बदलण्याचे काम फार खतरनाक होते. जपानी पाणबुडी सुभाषचंद्रांना घेऊन सुमात्राला गेली. (१ मे १९४३) सुमात्रा बेट जपान्यांच्या कब्जात होते. तेथून १६ मे १९४३ रोजी ते विमानाने टोकियोला पोचले. त्यापूर्वी जपानात हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या संदर्भात बरेच काही घडून गेले होते.

हिंदुस्थानचा व्हॉईसरॉय लॉर्ड हार्डिंज याच्या कारकिर्दीत, १९१२ साली, इंग्रजांनी हिंदुस्थानाची राजधानी कलकत्त्याहून दिल्लीला हलविली. स्वत: हार्डिंज २३ डिसेंबरला आगगाडीने दिल्लीला आला. नंतर सुशोभित हत्तीवर बसून मिरवणुकीने आपल्या राजवाड्याकडे (आताचे राष्ट्रपतिभवन) जात असताना हत्तीच्या पाठीवर बॉंब पडला! खवासखान्यातला लष्करी अधिकारी मारलाच गेला; पण खुद्द लाटसाहेबांना अनेक जखमा झाल्या. या जीवघेण्या हल्ल्याचा कसून शोध गुप्त-पोलिसांनी घेतला. वसंतकुमार विश्वास आणि त्याचे तिघे साथीदार यांना खुनाच्या आरोपाखाली पकडून, गुन्हा दाखल केला व ११ मे १९१५ रोजी त्यांना फाशी दिले. या कटाचा सूत्रधार असलेले राशबिहारी बोस मात्र पोलिसांच्या तावडीतून सुटले आणि १२ मे ला कलकत्त्याहून एका जपानी जहाजात बसून जून १९१५ मध्ये जपानात पोचले. तेथे त्या वेळी लाला लजपतराय आणि चीनमधील राष्ट्रनेता सन्-यत्-सेन हे दोघे शरणार्थी होऊन राहात होते. जपानमध्येही इंग्लंडचे गुप्तहेर होतेच. त्यांना राशबिहारी आल्याचे कळताच त्यांनी जपान सरकारकडे लकडा लावला की, राशबिहारी यांना पकडून हिंदुस्थानात पाठवा! पण राशबिहारी यांनी जपानमधील उजव्या राष्ट्रवादी गटाचा सामर्थ्यशाली पुढारी तोयामा याचा आश्रय घेतल्याने ते जपानात राहू शकले. नंतर राशबिहारींनी जपानी भाषेवर प्रभुत्व मिळविले. राशबिहारी सोमा नावाच्या कुटुंबात राहात असत. त्यांनी सोमांची मुलगी तोशिको हिच्याशी १९१७ साली लग्न केले. त्यांना एक मुलगा व एक मुलगी अशी अपत्ये झाली. तोशिको ही १९२५ साली वारली.

जपानमध्ये पोचल्यानंतरही राशबिहारी स्वस्थ राहिले नाहीत. आग्नेय आशियातील देशांच्या राजकीय नेत्यांच्या भेटीगाठी घेणे, अशा देशांतून हिंदुस्थानच्या








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्वातंत्र्याला अनुकूल असणारे मैत्रीसंघ स्थापणे, सभासंमेलने व परिषदा भरविणे, इंग्रजी, बंगाली, हिंदी पुस्तकांची जपानी भाषेत भाषांतरे करून ती प्रसिद्ध करणे असे त्यांचे उद्योग सतत चालू असत.

त्यांना या कामात साथ मिळाली ती अयप्पनपिल्लाइ माधवन् नायर (इथून पुढे 'नायर') या तरुणाची. हे गृहस्थ वयाच्या बाविसाव्या वर्षी, म्हणजे १९२७ साली, क्योटो विद्यापीठात स्थापत्य-अभियांत्रिकी शिकण्यासाठी केरळातून जपानला गेले. स्वदेशी असताना त्यांनी आपल्या चळवळींमुळे पोलिसांची संशयी नजर आपल्यावर ओढवून घेतली होतीच. क्योटो विद्यापीठातून त्यांनी अभियांत्रिकीची पदवी तर मिळविलीच पण जपानी भाषेतही प्राविण्य संपादन केले. जपानमध्ये पोचल्यानंतर थोड्याच दिवसात नायर यांनी राशबिहारी यांची, एप्रिल १९२८ मध्ये, भेट घेतली. राशबिहारींच्या व्यक्तिमत्त्वाचा असाधारण प्रभाव नायर यांच्यावर पडला आणि जपान, चीन, कोरिया, थायलंड इत्यादी देशातील भारतीय वंशाच्या लोकात व आम जनतेतही राशबिहारी यांनी हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा जो प्रचार चालविला होता त्यात ते सामिल झाले.

१९०५ साली जपानने रशियाचा पराभव केला आणि पूर्वेकडील एक प्रबळ सत्ता म्हणून जपानची ख्याती झाली. तेव्हापासूनच जपानात लष्करशाही व साम्राज्यवाद यांचा प्रभाव वाढू लागला. जपानने कोरिया हा देश जिंकला व नंतर चीन व रशिया यांच्या सापटीत असलेल्या मंगोलियात शिरून तेथे मॉंचुकुओ या नावाचे मांडलिक राष्ट्र निर्माण केले. खेरीज चीनमध्ये व्यापार व इतर संबंधात विशेष हक्क मिळावेत यासाठी वारंवार तंटे उपस्थित करून लष्करी कारवाया करण्याचा कार्यक्रम हाती घेतला. जपानच्या व साम्राज्यवादी उपक्रम ज्या लष्करी अधिकाऱ्यांच्या मुखत्यारीने चालत असे अशा अधिकाऱ्यांशी नायर यांचे घनिष्ट मैत्रीसंबंध होते. कारण, या अधिकाऱ्यांपैकी बरेच जण नायर यांच्या बरोबर क्योटो विद्यापीठात विद्यार्थी होते. सारांश जपानमधील अतिरेकी साम्राज्यवादी लष्करी अधिकारी आणि राशबिहारी व नायर यांच्या नेतृत्वाखालील हिंदी स्वातंत्र्याची चळवळ यांच्यात एक जवळचे नाते निर्माण झाले होते. तीसच्या दशकात या लष्करी गटाने जपानवर आपली पकड घट्ट केली होती आणि आग्नेय आशियात, विशेषतः चीनमध्ये, आक्रमक कारवायांनी साम्राज्य विस्तारले होते.

८ डिसेंबर १९४१ रोजी रविवार होता. अगदी सकाळीच जपानी विमानांनी अमेरिकेच्या पर्ल हार्बर या नाविक तळावर हल्ला चढविला. विमानवाहू जहाजातून ही विमाने पर्ल हार्बर हा तळ ज्या होनोलुलू नावाच्या बेटात होता, त्या बेटापाशी नेली होती. जपानी विमानांनी वादळी हल्ला चढवून प्रचंड बॉब-फेक केली. अमेरिकेच्या चार युद्ध-नौका, इतर अनेक लढाऊ जहाजे व दोनशे विमाने नष्ट झाली. दोन हजार जवान मारले गेले. त्याच दिवशी जपानचे बादशहा हिरोहिटो यांनी आकाशवाणीवरून संदेश प्रसारित केला व अमेरिका आणि ब्रिटन यांच्याशी युद्ध जाहीर केले. त्यानंतर जपानने थक्क करणारे विजय मिळविले. ९ डिसेंबर १९४१ रोजी जपानी आरमाराने सिंगापूरवर चढाई करून ब्रिटनच्या 'प्रिन्स ऑफ वेल्स' आणि 'रिपल्स' या युद्ध-नौका बुडविल्या. डिसेंबर १९४१ अखेर हॉंगकॉंग जपान्यांच्या हाती पडले आणि फेब्रुवारी १९४२ मध्ये सिंगापूरला ब्रिटिश सैन्याने शरणागती पत्करली.

या काळात श्री. नायर हे मांचुकोआत होते. तेथील जपानी लष्करी अधिकाऱ्यांशी त्यांचे मैत्रीचे संबंध होते. या जपानी अधिकाऱ्यांनी नायर यांना शांघायला पाठविले. शांघायमध्ये पुष्कळ सुखवस्तू हिंदी व्यापारी होते व पोलिसात बऱ्याच मोठ्या संख्येने शीख जवानही होते. हे लोक ब्रिटिश-प्रजाजन असल्याने जपानी लष्कर त्यांना शत्रुत्वाने वागविण्यात मुखत्यार होते. परंतु, नायर यांनी जपानी अधिकाऱ्यांना सांगून हिंदी लोकांवर जपानी लष्कराने अत्याचार करू नयेत व त्यांना मैत्रीने वागवावे अशी व्यवस्था केली. नायर यांनी शांघायमध्ये 'आझाद हिंद केंद्र' स्थापन केले. ४२ सालच्या २६ जानेवारीला या केंद्राने स्वातंत्र्यदिन साजरा केला (१९३० सालापासून

अनुक्रमणिका

मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

काँग्रेस २६ जानेवारीला स्वातंत्र्यदिन पाळत असे) नंतर नायर हाँगकाँगला गेले व तेथेही त्यांनी 'आझाद हिंद केंद्र' स्थापन केले. या केंद्राचा खर्च स्थानिक हिंदी लोकांच्या वर्गणीतूनच चालायचा होता; पण जपानी लष्कर नायर यांना वेळोवेळी खर्चासाठी पैसे देत असे.

हाँगकाँगहून नायर जपानला गेले. तेथे राशबिहारी, नायर व जपानी लष्करातील अधिकारी जनरल फुशियामा यांच्यात बराच विचार-विनिमय झाला. राशबिहारी व नायर हे जपानमध्ये हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठी प्रयत्न करीत होते त्याप्रमाणेच थायलंड, मलाया, ब्रह्मदेश, हाँगकाँग अशा, जपान्यांनी पाश्चिमात्त्य साम्राज्यांच्या छायेतून जे प्रदेश जिंकले होते त्या, प्रदेशातूनही स्थानिक स्वरूपाच्या चळवळी मूळच्या हिंदी लोकांनी चालविल्या होत्याच. या सर्व फुटकळ चळवळींना संघटित करण्यासाठी 'आझाद हिंद लीग' (इंडियन इंडिपेन्डन्स लीग) नावाची संघटना फेब्रुवारी १९४२ मध्ये स्थापण्यात आली व तिची मुख्य कचेरी टोकियोमधील 'सान्नो हॉटेल' या ठिकाणी उघडण्यात आली. या संघटनेने सुरुवातीपासूनच पाच तत्त्वे स्वीकारली होती. (१) कोणाही व्यक्तीच्या किंवा गटाच्या फायद्यासाठी या संघटनेचा उपयोग होऊ दिला जाणार नाही. (२) सगळ्या उपसंघटनांचे ध्येय एकच–हिंदुस्थानाला स्वतंत्र करणे–असेल. (३) काँग्रेस पक्षाच्या नेत्यांना पाठिंबा देण्याचेच धोरण ही संघटना अवलंबील आणि या नेत्यांना विरोध करणारी किंवा त्यांचा अपमान करणारी कृती या संघटनेकडून होणार नाही. (४) कोणाही अ–हिंदी मनुष्याला या संघटनेचे सभासद होता येणार नाही किंवा या संघटनेच्या कार्यात भाग घेता येणार नाही. (५) जपानी अधिकार मंडळाकडून संघटना सहाय्य घेईल परंतु संघटनेची धोरणे ठरविण्यात किंवा त्यांची अंमलबजावणी करताना कोणाचीही ढवळाढवळ संघटना होऊ देणार नाही.

या वेळी जपानने थायलंड हा देश जिंकला होता व त्यांच्या फौजा मलाया या देशात घुसल्या होत्या. मलाया देशात हिंदी लोक मोठ्या संख्येने होते. जपानी फौजा स्थानिक जनतेवर अनन्वित अत्याचार करीत अशी प्रसिद्धी होती. पण 'आझाद हिंद लीग'ने जपानी सेना–प्रमुखांच्या मागे लागून त्यांना सैन्याकडे अशा आज्ञा पाठविण्यास प्रवृत्त केले की, हिंदी जनतेला सैन्याने कोणतीही तोशिस लागू देऊ नये. त्यामुळे थायलंड, मलाया येथील हिंदी जनतेला जपानी सैन्याच्या अत्याचारांपासून संरक्षण मिळाले. इतकेच नव्हे तर मलायातील ब्रिटिश सैन्याने १५ फेब्रुवारी १९४२ रोजी शरणागती पत्करल्यानंतर जे ४५ हजार हिंदी सैनिक युद्धकैदी झाले त्यांनाही जपान्यांनी, इतर युद्धकैद्यांना दिली त्या प्रकारची, क्रूर वागणूक दिली नाही. मलाया–सिंगापूर येथील ब्रिटिश सैन्याचा पराभव झाल्यावर जपानचा पंतप्रधान (व एका अर्थाने लष्करशहा) जनरल टोजो याने जपानी संसदेत भाषण करून सांगितले की, "आम्ही हिंदी लोकांना शत्रू समजत नाही व हिंदी लोकांच्या स्वातंत्र्यासाठी चाललेल्या लढ्याला आमचा 'निष्काम' पाठिंबा आहे. हिंदुस्थान जिंकावा व त्याला गुलाम करावे, असा आमचा उद्देश नाही."

आग्नेय आशियाई प्रदेशात 'आझाद हिंद लीग'चे स्वायत्त स्थान लोकांपुढे यावे या इच्छेने राशबिहारी व नायर या दोघांनी २८ मार्च १९४२ रोजी टोकियोमध्ये आग्नेय आशियातील हिंदी लोकांच्या प्रतिनिधींची एक परिषद भरवली. या परिषदेस हाँगकाँग, थायलंड, मलाया व खुद्द जपान या देशातून मिळून २५ प्रतिनिधी आले होते. अध्यक्षस्थानी राशबिहारी होते व त्यांना 'बदली' म्हणून नायर यांनी काम पाहिले. इतक्या निरनिराळ्या ठिकाणचे, वेगवेगळ्या परिस्थितीतून गेलेले, पूर्वी कधी एकमेकांना न भेटलेले प्रतिनिधी परिषदेत असल्यावर परिषदेत कडाक्याचे मतभेद व वाद होणार हे साहजिकच होते. तथापि, त्या वेळची युद्धाची स्थिती इतकी गंभीर होती की, त्या दडपणाखाली प्रतिनिधींना सामंजस्याने व एकमताने निर्णय घ्यावे लागले. परिषदेच्या शेवटी राशबिहारी यांना 'आझाद हिंद लीग'चे अध्यक्ष म्हणून निवडण्यात आले. राशबिहारींसकट पाच जणांची कार्यकारिणी नेमण्यात



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आली. (तीमध्ये नायर नव्हते.) नायर यांना जपानी लष्करातील हिंदुस्थान विषयक विभाग आणि आझाद हिंद लीग यांच्यातील वकील (लियेझों) आणि प्रसिद्धीप्रमुख अशा महत्त्वाच्या पदांवर नेमले गेले. परिषदेनंतर प्रतिनिधीमंडळ जपानचे पंतप्रधान (व लष्करशहा) जनरल टोजो यांना जाऊन भेटले.

या परिषदेच्या वेळी, प्रथमच, 'आझाद हिंद फौजे'चा विषय आग्नेय आशियातील राजकीय नेत्यांच्या समोर आला. आग्नेय आशियातील हिंदी प्रजेच्या प्रश्नांसाठी जपानी लष्कराने बँकॉक मध्ये एक खास विभाग उघडला होता. कर्नल तामुरा व त्याचा सहाय्यक मेजर फुजिवारा या (हिंदी) विभागाचे काम पहात असत. पुढे जपान्यांनी मलाया जिंकल्यानंतर फुजिवारा मलायात गेला व तेथे त्याने ब्रिटिश सैन्यातील जे हिंदी जवान युद्धकैदी झाले होते त्यांच्यामधून जपानी सैन्याला सहाय्यक असे हिंदी सैन्य उभे करावे, असे ठरविले. खरे तर या बाबतीत कोणताच निर्णय घेण्याचा अधिकार फुजिवाराला नव्हता. सैन्य उभारणीसाठी त्याला ब्रिटिशांच्या मलायातील सैन्यापैकी एक युद्धकैदी कॅप्टन मोहनसिंग याची मदत मिळाली. पुढे सिंगापूर पडल्यावर, मागे सांगितल्याप्रमाणे, हिंदी युद्धकैद्यांची संख्या ४५,००० वर गेली. त्यातून एक मोठे सैन्य उभे राहील अशी अपेक्षा उत्पन्न झाली. यामुळेच राशबिहारी यांनी जपानी सेनाप्रमुखांना विनंती केली की, टोकियो येथील परिषदेला हिंदी युद्धकैद्यांच्या प्रतिनिधींना पाठवावे. त्याप्रमाणे कॅ. मोहनसिंग व कर्नल निरंजन सिंग गिल असे दोघे परिषदेस हजर होते. मात्र त्या दोघात एकमेकाविषयी गाढ अविश्वास होता; मोहनसिंग फुजिवाराच्या अर्ध्या वचनात असे तर गिल हा मोठ्या घराण्यातला व ब्रिटिश सैन्यातील वरच्या दर्जाचा अधिकारी असल्याने मोहनसिंगाचा तिटकारा करी. टोकियोहून मलायात परतल्यावर मोहनसिंगाने आझाद हिंद फौजेची पद्धतशीर उभारणी करण्याचे काम हाती घेतले. असे सांगतात की, ही फौज बारा हजारापर्यंत गेली. या उभारणीतही मोहनसिंगाने बरीच हडेलहप्पी केली. 'मी मोहनसिंग या व्यक्तीवर निष्ठा ठेऊन काम करीन,' अशी शपथ तो भरती होणाऱ्या सैनिकांना व अधिकाऱ्यांना घ्यायला लावी. भरती होणारे सर्वच सैनिक काही देशाच्या स्वातंत्र्याच्या इच्छेने पेटलेले नसत. जपान्यांचे युद्धकैदी म्हणून राहाण्यापेक्षा आझाद हिंद फौजेत असणे बरे, या विचारानेही ते फौजेत भरती होत.

यानंतर आझाद हिंद लीगने आपले मुख्यालय बँकॉक इथे हलवले. जपानी सरकारनेही 'आझाद हिंद लीग'शी घनिष्ट संबंध राहावेत यासाठी 'हिकारी किकान' नावाचा एक विभाग बँकॉकमध्येच उघडला. 'आझाद हिंद लीग' (इथून पुढे 'लीग')चा प्रसार हिंदुस्थानात व आग्नेय आशियात करता यावा यासाठी जपान रेडिओमध्ये खास विभाग होताच पण बँकॉकमध्येही रेडिओ केंद्र चालू करण्यात आले. या वेळी जपानची चढती कमान होती. फेब्रुवारी ४२ मध्ये सिंगापूर पडले व मार्चमध्ये जपान्यांनी रंगून जिंकले. पुढे (आताचा) इंडोनेशिया (जो त्यावेळी डचांच्या कब्जात होता) जपान्यांनी जिंकला. अशा या शुभशकुनी वातावरणात राशबिहारींनी आझाद हिंद लीगची दुसरी परिषद १५ जून १९४२ रोजी बँकॉकमध्ये भरविली.

(२)

या परिषदेला १२० प्रतिनिधी हजर होते. पहिल्याच सत्रात कॅ. मोहनसिंग याने वाद उपस्थित केला. त्याचे म्हणणे असे होते की, आझाद हिंद फौजेवर फक्त कॅ. मोहनसिंगाचाच अधिकार चालेल; आणि लीगचे कोणतेही नियंत्रण फौजेवर असणार नाही. दुसरे असे की, फौजेतील जवान व अधिकारी कॅ. मोहनसिंगाशी एकनिष्ठ राहाण्याची शपथ घेतील. कॅ. मोहनसिंगाला ही अरेरावी करण्याला 'हिकारी किकान' (जपानी सैन्याचा हिंदुस्थानाविषयीचा विभाग) मधील काही कनिष्ठ अधिकाऱ्यांचे प्रोत्साहन होते. मोहनसिंगाच्या या उद्धट प्रस्तावाचा परिषदेतील अनेक प्रतिनिधींना फार राग आला व परिषद उधळणार अशी चिन्हे दिसू लागली. राशबिहारी अध्यक्ष होते. त्यांनी



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

परिस्थिती हाताबाहेर जात आहे असे पाहून सभा स्थगित केली. त्यावेळी नायर यांनी 'हिकारी किकान'च्या उच्चाधिकाऱ्यांशी संपर्क साधून मोहनसिंगाच्या उद्धटपणाला लगाम घातला. नंतरची सत्रे फारशी गरमा-गरमी न होता पार पडली.

या परिषदेत अनेक ठराव करण्यात आले. त्यांपैकी आझाद हिंद फौजेविषयी केलेले ठराव खालीलप्रमाणे होते. (१) आझाद हिंद लीगने आझाद हिंद फौज निर्माण करावी. तीमध्ये (ब्रिटिश सैन्यातील) हिंदी सैनिक तसेच हिंदी प्रजाजन यांचा समावेश असावा. (२) फौजेतील जवान व अधिकारी हे लीगचे सभासद असतील व फौजेवर केवळ लीगचाच अधिकार चालेल. या फौजेचा उपयोग हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळविण्यासाठीच केला जाईल. (३) जर ब्रिटिश किंवा इतर कोण्या परकीय सत्तेविरुद्ध लढण्याचा प्रसंग आलाच तर लीगची कार्यकारिणी जपानी लष्करी अधिकारी व आझाद हिंद सेनेचे अधिकारी यांचे संयुक्त मंडळ स्थापून आझाद हिंद फौजेचे सामर्थ्य त्याच्या हवाली करील. (४) लीगची कार्यकारिणी हिंदुस्थानाच्या जनतेत आणि हिंदी सैन्यात क्रांतिप्रवण भावना निर्माण करण्याचे प्रयत्न करील. (आझाद हिंद फौजेकरवी) कोणतीही लष्करी कारवाई करण्यापूर्वी अशा तऱ्हेची क्रांतीला उपकारक भावना निर्माण झाली आहे, याची खात्री पटवून घेण्यात येईल.

यानंतर राशबिहारी यांनी आपले मुख्यालय सिंगापूरला नेले. नायर व त्यांचे सहकारी लीगचा रेडिओ व वृत्तपत्रातून प्रचार करण्यासाठी बँकॉकलाच राहिले. राशबिहारी सिंगापूरला गेले तेव्हा मोहनसिंग सिंगापूर-मलाया येथील हिंदी युद्धकैद्यातून आझाद हिंद फौजेची उभारणी करण्याच्या प्रयत्नात होता. अजूनही त्याचा जुना खाक्याच चालू होता. भरती होणाऱ्या जवान व अधिकाऱ्यांना तो स्वतःशी (मोहनसिंगाशी) एकनिष्ठ राहाण्याची शपथ घ्यायला लावी. त्यामुळे अनेक मुसलमान 'फौजे'त भरती झाले नाहीत. 'हिकारी किकान'चा सर्वोच्च अधिकारी कर्नल इवाकुरो याच्याशी त्याचे तंटे होऊ लागले. खुद्द राशबिहारी यांचा तो अपमान करू लागला. शेवटी, नाइलाजाने, २९ डिसेंबर १९४२ रोजी, राशबिहारी यांनी त्याला लीगमधून तसेच फौजेच्या अधिकारपदावरून काढून टाकले आणि कर्नल इवाकुरो याने त्याला नजरकैदेत ठेवले! याच सुमाराला कर्नल निरंजनसिंग गिल याला जपान्यांनी 'ब्रिटिशांसाठी हेरगिरी करतो' या आरोपावरून अटक केली होती.

या वेळी राशबिहारी यांनी नायर यांना सिंगापूरला बोलावून घेतले. मोहनसिंग आणि निरंजनसिंग गिल दोघेही गेल्यानंतर फौजेला नेतृत्वच उरले नव्हते. अशा वेळी कर्नल जगन्नाथराव भोसले व कर्नल गिलानी यांची नावे पुढे आली. अनेक महत्त्वाच्या व्यक्तींशी विचार-विनियम करून व खुद्द गिलानी यांनी सुचविल्यावरून जगन्नाथराव भोसले यांची आझाद हिंद फौजेचे मुख्याधिकारी (कमांडिंग ऑफिसर) म्हणून नेमणूक करण्यात आली. त्यांना मदतीसाठी म्हणून चार कर्नल अधिकाऱ्यांचे मंडळ नेमण्यात आले. या सर्वांनी एकमताने काम करून व 'हिकारी किकान'शी खेळीमेळीचे संबंध राखून फौजेची सुयोग्य बांधणी केली.

हे सर्व इतक्या विस्ताराने येथे सांगण्याचे कारण असे की, पुष्कळ लोकांची अशी सरधोपट समजूत आहे की, आझाद हिंद फौजेची उभारणी सुभाषचंद्रांनीच केली. पण ही समजूत बरोबर नाही. सुभाषचंद्र आग्नेय आशियात जाण्याच्या आधीपासून फौज चांगल्या स्थितीत काम करीत होती. दुसरे कारण हे की, आझाद हिंद लीगला कोणत्या अडचणीतून मार्ग काढावा लागत होता, याची कल्पना यावी. फौजेतील जवानांपैकी बहुतेक जवान मुळात ब्रिटिश सैन्यातील होते, त्यांनी ब्रिटिश सम्राटाशी एकनिष्ठ राहण्याची शपथ घेतली होती. आताही ते फौजेत भरती होत होते ते स्वातंत्र्यप्रेमामुळे, अशी स्थिती नव्हती. जपानी सैन्य युद्धाकैद्यांना किती क्रूरपणाने वागवीत होते, हे त्यांनी पाहिले होते. मलाया, थायलंड, कंबोडिया येथील जंगलातून या युद्धकैद्याना उपाशी ठेवून कामे करून घेत. या जंगलात जहरी साप, विषारी कीटक व त्यांच्यापासून



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होणारे आजार यांना तोंड देत किंवा बळी पडून दिवस कंठावे लागत. अशा स्थितीत 'आझाद हिंद फौज' हा पर्याय या युद्धकैद्यांना मिळाला होता. असो.

आता 'आझाद हिंद लीग'ने आपले मुख्य कार्यालय बँकॉकहून सिंगापूर इथे हलविले. जगन्नाथ भोसले यांच्या नेतृत्वाखालील फौजेची मानवंदना राशबिहारींनी सिंगापूरलाच स्वीकारली. इथेच 'हिकारी किकान'ने एक रेडिओ केंद्र लीगच्या स्वाधीन केले. नायर, शिवराम (बँकॉकमधील एक नामवंत पत्रकार) आणि अय्यर (बँकॉकमधील 'रॉयटर'चे प्रतिनिधी) यांनी रेडिओ केंद्रावरून त्याचप्रमाणे पत्रके, वार्तापरिषदा यांच्याद्वारे लीगच्या प्रचाराचे काम सुरू केले. त्यांनी एक वर्तमानपत्र सुरू केले. इंग्रजी, हिंदी, तमिळ, व मल्याळी या चार भाषातून या वृत्तपत्रातील मजकूर छापला जाई. रेडिओवरून इंग्रजी व पंधरा भारतीय भाषातून कार्यक्रम प्रसारित होत. दररोज ६ तास केंद्र चालत असे.

१९४३ सालाच्या सुरुवातीला राशबिहारी बोस यांची प्रकृती खालावत चालली. त्यांना मधुमेहाचा विकार फार वर्षापासून होता. बँकॉकला आल्यापासून त्यांना खूप मनस्ताप आणि दगदग सोसावी लागली होती. त्यामुळे हा विकार बळावला होता. नंतर त्यांना फुप्फुसाचा क्षय हा घातक आजार झाला. काम करणे अशक्य झाल्यामुळे राशबिहारींनीच सुचविले की, सुभाषचंद्रांना जर्मनीतून आग्नेय आशियात आणावे. त्यानंतर नायर यांच्या विनंतीवरून 'हिकारी किकान'ने जपानी लष्कराच्या उच्चाधिकाऱ्यांना 'सुभाषचंद्रांना जर्मनीतून आणावे' अशी शिफारस केली. या लेखाच्या सुरुवातीला आम्ही सांगितलेच आहे की, केवढ्या जोखमीचा प्रवास करून सुभाषचंद्र १६ मे ला टोकियोला आले.

राशबिहारी, इतक्या आजारी स्थितीतही, सुभाषचंद्रांच्या स्वागतासाठी टोकियोला उपस्थित होते. राशबिहारी यांनी जपानचे वरिष्ठ लष्करी अधिकरी व लष्करशहा जनरल टोजो याच्याशी सुभाषचंद्रांची रूजवात घालून दिली. पुढील योजनांविषयी दीर्घ काळ वाटाघाटी झाल्या आणि सुभाषचंद्र व राशबिहारी २ जुलै १९४३ या दिवशी सिंगापूरला पोचले आग्नेय आशियातील व विशेषतः मलायातील हिंदी लोकांना आनंदीआनंद वाटला!

(३)

४ जुलै १९४३ या दिवशी सिंगापूरला कॅथे सभागृहात राशबिहारींनी चळवळीची सूत्रे सुभाषचंद्रांच्या हाती समारंभपूर्वक दिली. त्यानंतर सुभाषचंद्रांनी एक स्फूर्तिदायक व्याख्यान दिले. 'आझाद हिंद सरकार' स्थापण्याचा आपला मनोदय त्यांनी तेथे प्रकट केला. ५ जुलैला सुभाषचंद्रांनी सिंगापूरच्या मैदानात हिंदी सैनिक आणि हिंदी प्रजाजन यांची फार मोठी सभा घेतली. त्या दिवशी त्यांनी नागरी वेष टाकून लष्करी पोषाक परिधान केला होता. पायात घोट्यापर्यंत पोचणारे 'बूट' घातले होते. सुभाषचंद्रांचे व्याख्यान अभिनिवेशपूर्ण झाले. आझाद हिंद फौजेच्या बळावर हिंदुस्थानावर स्वारी करून हिंदुस्थानाला स्वतंत्र करण्याचे आपले स्वप्न त्यांनी लोकांपुढे ठेवले. 'चलो दिल्ली'ची विख्यात घोषणा त्यांनी याच सभेत दिली. भावनाविवश होऊन ते म्हणाले, "देशासाठी हौतात्म्य तुम्ही पत्कराल, पण त्याच्या बदल्यात तुम्हाला मी फक्त भूक, तहान, आपदा, झेप घेणारी आक्रमकता व मृत्यू हेच पारितोषिक म्हणून देऊ शकतो." ६ जुलैला आझाद हिंद फौजेचे संमेलन झाले व सुभाषचंद्रांनी मानवंदना स्वीकारली. या वेळी जपानचा पंतप्रधान व सेनाप्रमुख जनरल टोजोही हजर होता. "ब्रिटिशांपासून स्वातंत्र्य मिळविण्यासाठी जपान लागेल ती मदत करण्यास तयार आहे", असे त्याने आपल्या भाषणात सांगितले.

सिंगापूरला सुभाषचंद्र येताच अंधाराच्या वेलीला चैतन्याच्या दीपकळ्या फुटाव्यात तसा लखलखाट झाला. मलाया, सिंगापूर, थायलंड येथील प्रत्येक हिंदी घरातून उत्साहाचे वातावरण ओसंडू लागले. हिंदी युद्धकैद्यांमध्ये आझाद हिंद फौजेत सामील होण्याची अहमहमिका लागली. नागरी व्यवसायातील हिंदी जनता देखील फौजेत दाखल होऊ लागली. ज्यांना









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रत्यक्ष लष्करात जाणे शक्य नव्हते त्यांनी आझाद हिंद सरकारला सढळ हाताने देणग्या दिल्या. थोड्याच दिवसात असे अधिकृतरित्या जाहीर करण्यात आले की, आझाद हिंद फौजेची संख्या ३० हजाराहून जास्त झाली आहे.

इकडे राशबिहारी यांची प्रकृती ढासळतच गेली व वैद्यकीय सल्ल्यानुसार त्यांनी टोकियोला उपचारासाठी जाण्याचे ठरविले. जाण्यापूर्वी त्यांची इच्छा सुभाषचंद्रांची भेट घेण्याची होती. सुभाषचंद्रांनी स्वतः आपल्या अलिशान शेव्हरोलेट गाडीतून राशबिहारींना आपल्या घरी आणले. दोघांची एकांतात भेट झाली. नायर सांगतात की, राशबिहारींनी, परत स्वगृही आल्यावर, भेटीतल्या बोलण्याचा सारांश मला (पक्षीः नायर यांना) सांगितला. राशबिहारींनी सांगितले की, जपान्यांचे विचार झापडे लावून चालतात.. त्यांनी, समजा, हिंदुस्थानच्या भूमिवर पाय टाकलाच आणि ते ब्रिटिशांशी लढले तर ते त्याचा मोबदला मागितल्याखेरीज राहाणार नाहीत. तेव्हा जपानी फौजेबरोबर आझाद हिंद फौज नेऊन हिंदुस्थान 'स्वतंत्र' करता येईल, अशी अपेक्षा ठेवू नका. दुसरा मुद्दा हा की, आझाद हिंद फौज सामर्थ्यशाली करावी. पण हिंदुस्थानवर स्वारी करण्यासाठी तिचा उपयोग होऊ शकणार नाही. हिंदुस्थानातच ब्रिटिशांविरूद्ध उठाव झाला तर त्याला बाहेरून मदत करणे आझाद हिंद फौजेला शक्य होईल. तिसरा विचार असा की, जपानी फौजांना बरोबर घेऊन आझाद हिंद फौज हिंदुस्थानवर स्वारी करून गेली तर काँग्रेस पक्ष त्या फौजेचे स्वागत करणार नाही. ब्रिटिशांच्या जोखडातून सुटण्यासाठी दुसऱ्या कुणाचे जू मानेवर घेणे काँग्रेसला मान्य होणार नाही. हा गोषवारा सांगून राशबिहारी म्हणाले की, "सुभाषचंद्रांनी यावर काहीच उत्तर दिले नाही. पण त्यांचा चेहरा पडला होता."

सुभाषचंद्रांची देशभक्ती अतुलनीय होती, त्यांची साहसिकता अद्वितीय होती, त्यांची समर्पणवृत्ती अनुपमेय होती आणि त्यांचे व्यक्तिमत्त्व अत्यंत प्रभावशाली होते. आपली बाजू फार आक्रमक पद्धतीने ते मांडत असत. त्यांचे वक्तृत्व अतिशय परिणामकारक होते आणि अफाट जनसंमर्दाला हेलावून टाकण्याचे सामर्थ्य त्यांच्या वाणीत होते. त्यांचा कामाचा झपाटा स्तिमित करून टाकणारा होता. राशबिहारींचा सल्ला काहीही असला तरी सुभाषचंद्रांनी निश्चय केला होता की, आझाद हिंद फौजेचे उत्तम दर्जाच्या लढाऊ सैन्यात रूपांतर करावयाचे व ब्रह्मदेशातून हिंदुस्थानावर हल्ला करावयाचा. २१ ऑक्टोबर १९४३ या दिवशी सिंगापूरच्या कॅथे चित्रपटगृहात सुभाषचंद्रांनी मोठी सभा बोलावून आझाद हिंद सरकारची घटना लोकांपुढे मांडली. त्यांनी स्वतःकडे 'राष्ट्रप्रमुख' हे पद घेतले. एक मंत्रिमंडळ स्थापून त्यात कॅप्टन लक्ष्मी यांच्याकडे स्त्री संघटनांचे कार्य दिले; कर्नल जगन्नाथराव भोसले यांना आझाद हिंद फौजेचे प्रमुख केले आणि अय्यर यांना प्रचार खाते दिले. स्वतः सुभाषचंद्र यांनी स्वतःकडे पंतप्रधान, युद्ध आणि परराष्ट्रमंत्री, आझाद हिंद फौजेचे सर्वोच्च सेनापती इतकी पदे ठेवली. राशबिहारी बोस यांना त्यांनी 'सर्वोच्च सल्लागार' हे पद दिले. राशबिहारी तेव्हा टोकियोत होते.

(४)

तथापि या सगळ्या झगमगाटाला एक डागीळ बाजूही होती; ती तेव्हा फारच थोड्या लोकांच्या ध्यानात आली. समपर्णवृत्ती व साहस यांच्यामुळे एक प्रकारची बेहोषी येते आणि वास्तवाचे भान सुटत जाते. जपानी लष्कर हा आझाद हिंद सरकारचा एकमेव आधार होता; पण जपानी सेनानींचा विश्वास व निखळ पाठिंबा सुभाषचंद्रांना लाभला नाही. सुभाषचंद्रांचे 'नेताजी' हे बिरुद जपान्यांच्या कधीच पचनी पडले नाही. हिटलरच्या 'फ्युरेर' या किताबाशी 'नेताजी'चे असलेले साम्य जपान्यांच्या लक्षात आले होते व सुभाषचंद्रांवर जर्मनीचा प्रभाव आहे असे जपानी सेनाधिकाऱ्यांना वाटत होते. सुभाषचंद्र जपान्यांशी बोलताना आक्रमक भाषा वापरीत तिची जपान्यांना चीड येई. पुढे असे झाले की, आझाद हिंद सरकार व जपान्यांचे 'हिकारी किकान' हे खाते





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यांच्यातील संवादच संपला. आझाद हिंद सरकारने 'हिकारी किकान'कडे शस्त्रे, दारूगोळा, लष्करी सामान यांच्या मागण्या कराव्या व जपान्यांनी त्या अर्ध्यामुर्ध्या भागवाव्यात इतपतच संबंध उरले. परिणाम असा झाला की, आझाद हिंद फौज ही लढाईला पात्र असे सैन्यदल म्हणून कधी उभी राहिलीच नाही. त्यांना उत्तम व आधुनिक शस्त्रे व उत्तम दर्जाचे प्रशिक्षण मिळाले नाही. अगदी अनुकूल काळातसुद्धा फौजेतल्या जवानांची संख्या १२ ते १५ हजारांच्या दरम्यानच घुटमळत राहिली. जपानी सैन्याने आझाद हिंद फौजेला एक स्वतंत्र सेना म्हणून कधीच मान्यता दिली नाही. त्यांना अशी भीती वाटे की, ही फौज स्वतंत्रपणे इंग्रजांशी लढायला गेली आणि इंग्रजांनाच सामिल झाली, तर विचित्र परिस्थिती ओढवेल. त्यामुळे फौजेने जपानी अधिकाऱ्यांच्या हुकमतीखालीच काम केले पाहिजे.

सुभाषचंद्र मलायात पोचले त्याच सुमाराला जपानची युद्धातली सरशी संपत आली होती. जपानने अचानक केलेल्या हल्ल्यांमुळे भांबावून गेलेली अमेरिका व इंग्लंड ही राष्ट्रे थोड्याच दिवसात सावरली. अमेरिकेने जनरल मॅकॉर्थरच्या अधिपत्याखाली व इंग्लंडने मौंटबॅटनच्या सेनापतित्वाने नवीन सैन्य उभारणी करून जपानला चिमटीत पकडण्याची व्यूहरचना चालविली होती. उत्तर पॅसिफिक महासागरातील 'मिडवे' नावाच्या बेटाजवळ जून १९४२ मध्ये जपानचा फार मोठा पराभव झाला. त्यानंतर फेब्रुवारी १९४३ मध्ये ग्वाडाल कानाल बेटाजवळ जपानी आरमाराने सपाटून मार खाल्ला. जपानची संदेश पाठविण्याची सांकेतिक भाषा अमेरिकनांनी उलगडली होती. त्यामुळे जपानच्या सर्व हालचालींची आगाऊ माहिती अमेरिकन सैन्याला मिळत होती. अशा अवघड स्थितीत आझाद हिंद सरकारला पुरेशी मदत करणे जपान्यांना शक्य नव्हते. तरीही सुभाषचंद्र हिंदुस्थानवर स्वारी करण्यासाठी जपानकडे तगादा लावत होते.

सुभाषचंद्र हे श्रेष्ठ नेते होते यात शंकाच नाही. पण त्यांच्या ठिकाणी काही दोषही होते. पैशाचा काटेकोर हिशेब ठेवून घेणे त्यांना जमले नाही. मलाया, ब्रह्मदेश, थायलंड येथील श्रीमंत, गरीब, कामगार, घरगडी अशा सर्वांनी सुभाषचंद्रांच्या प्रभावी वक्तृत्वाने भावनावश होऊन आपल्या जवळचे होते नव्हते ते सारे धन आझाद हिंद सरकारला अर्पण केले. त्या वेळी दाट बोलवा अशी होती की, फार मोठ्या प्रमाणावर पैशाची अफरातफर झाली आहे. दुसरा भाग असा की, आझाद हिंद फौजेची हिंदुस्थानावरील स्वारी यशस्वी व्हावयाची तर हिंदुस्थानातील जनतेचा त्याच वेळी उठाव झाला पाहिजे व ब्रिटिश सैन्यातील हिंदी जवान व अधिकारी यांनी बंड केले पाहिजे. हिंदी जनतेवर त्या वेळी गांधी, नेहरू व त्यांचा काँग्रेसपक्ष यांचे वर्चस्व होते. तेव्हा आझाद हिंद सरकारने काँग्रेसला चुचकारूनच आपल्या हालचाली करायच्या होत्या. सुभाषचंद्रांना हे सारे माहीतच होते व त्यानुसारच त्यांची भाषणे होत. पण एकदा सुभाषचंद्रांनी रेडिओवरून करावयाच्या भाषणाचा तर्जुमा तयार केला. त्यात गांधी, नेहरु व इतर काँग्रेस नेत्यांवर कडक भाषेत कठोर टीका केली होती. नायर यांच्या नजरेला तो तर्जुमा पडल्यावर त्यांनी त्यात सुधारणा केली व टीकेचे उल्लेख गाळून टाकले. गांधी, नेहरु व काँग्रेसश्रेष्ठींनी सुभाषचंद्रांवर जो 'अन्याय' केला होता त्याविषयीचा संताप सुभाषचंद्रांच्या मनात खदखदत असे व तो असा नकळत बाहेर पडे.

ज्यांनी राशबिहारींबरोबर काम केले होते अशा नायर, शिवराम, देशपांडे इत्यादी लोकांना राशबिहारी व सुभाषचंद्र यांच्या नेतृत्वाच्या शैलीतील फरक वारंवार जाचत असे. राशबिहारी आसपासच्या लोकांशी खेळीमेळीने व बरोबरीच्या नात्याने वागत. त्यांच्याशी सल्लामसलत करून निर्णय घेत. या उलट सुभाषचंद्र सहकाऱ्यांपासून कायम अंतर राखून असत. आपण राष्ट्रप्रमुख व सैन्यप्रमुख आहोत, हा कुर्रा त्यांच्या वागण्यातून दिसून येई. सुभाषचंद्रांना भपक्याने राहाण्याची हौस होती. स्वत:साठी विशाल घरे ते राखून ठेवीत. त्यांना वापरण्यासाठी मोठ्या व अलिशान गाड्या असत. या गोष्टी लोकांच्या डोळ्यावर येत.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

(५)

नोव्हेंबर १९४३ मध्ये दोस्त राष्ट्रांनी (इंग्लंड, अमेरिका, रशिया व चीन) कैरो व तेहेरान इथे शिखर-परिषदा घेतल्या व जपानला नेस्तनाबूत करण्याचा निश्चय केला. त्याला उत्तर म्हणून टोजोने टोकियोत 'महत्तर पूर्व आशिया परिषद' भरविली. या परिषदेला सुभाषचंद्र, ब्रह्मदेशाचा राष्ट्रप्रमुख डॉ. बा. मॉव, थायलंडचा पिबुलसंग्राम व इंडोनेशियाचा सुकर्ण असे अनेक नेते हजर होते. पाश्चात्त्य साम्राज्यवाद्यांचा पूर्ण निश्चय होई तो लढा चालू ठेवण्याचा निर्धार या परिषदेत व्यक्त करण्यात आला. या परिषदेच्या अखेरीला टोजोने अशी घोषणा केली की, आझाद हिंद सरकारला स्वतःची भूमी असावी म्हणून अंदमान-निकोबार बेटांचा ताबा त्या सरकारकडे देण्यात येईल. अर्थात्, ही केवळ तोंडदेखली भाषा होती; प्रत्यक्षात या बेटांवर जपानी सैन्याचाच ताबा राहाणार होता. पण या घोषणेमुळे आग्नेय आशियातील हिंदी लोकांना फार हुरूप आला.

परिषदेनंतर सुभाषचंद्र टोकियोतच काही काळ राहिले व जपानी उच्चस्तरीय मंडळींकडे त्यांनी आपल्या हिंदुस्थानवरील स्वारीसाठी मदत मागितली. जपानची स्थिती आणखीच बिघडली होती. बहुतेक सर्व आघाड्यांवर त्यांचे पराभव होत होते. बारा वर्षांच्या मुलांपासून साठीच्या म्हाताऱ्यापर्यंत सर्वांना सैन्यात सक्तीने भरती केले जात होते. बारा ते चाळीस वयोगटातील स्त्रियांनाही सैन्यात घेतले होते. धातु, इंधन, अन्नपाणी सगळ्याचीच वानवा होती. प्लायवुड वापरून विमाने बनवली जात होती. त्यामुळे हिंदुस्थानवरील मोहिमेसाठी मदत करण्याचे सामर्थ्य जपानपाशी नव्हते.

तरी सुभाषचंद्रानी जिद्द सोडली नाही. त्यांनी आझाद हिंद सरकारची 'राजधानी' रंगूनला नेली. (जानेवारी १९४४) रंगून आकाशवाणीवरून या सरकारचा प्रचार सुरू झाला. नायर सिंगापूरलाच राहून 'आझाद हिंद लीग'चे काम पाहात व प्रचारकार्य चालवीत. सुभाषचंद्रांनी अंदमान-निकोबार बेटांचा 'ताबा' जपान्यांकडून घेतला व लेफ्टमंन कर्नल लोकनाथन् यांची तेथे मुख्य आयुक्त म्हणून नेमणूक केली. त्यानंतर त्यांनी पुनः हिंदुस्थानावरील मोहिमेसाठी टोजोची मनधरणी करण्यास सुरुवात केली. टोजोला हे समजत होतेच की, सध्याच्या बिकट स्थितीत ही नवी आघाडी उघडण्यात हशील नाही. पण अखेरचा निकराचा लढा म्हणून त्याने या मोहिमेला मान्यता दिली असावी.

त्या वेळी जपानच्या ब्रह्मदेश-विभागातील सैन्याचा प्रमुख ले. ज. कावाबे व नवीन मोहिमेचा सेनापती ले. ज. मुटागुची या दोघांचाही आझाद हिंद फौजेला प्रस्तावित स्वारीत महत्त्वाची भूमिका द्यायला ठाम विरोध होता. फौजेचे एक पथक प्रायोगिक तत्त्वावर आघाडीवर न्यावे व ते लढाईत चांगली कामगिरी करू शकले तर फौजेला आणखी काही महत्त्वाची कामगिरी द्यावी; एरवी फौजेने जपानी सैन्याला रसद पुरविणे, परतीच्या मार्गावर गस्त घालून रस्ते मोकळे राखणे अशी दुय्यम कामे करावीत, इतपत महत्त्व 'फौजेला' द्यायला जपानी सेनापती तयार झाले. खुद्द जपानी सैन्याची तयारीही विश्वास वाटावा अशी नव्हतीच. जवानांची संख्या १ लाख २० हजार इतकी होती. पण दारूगोळा, शस्त्रास्त्रे यांची वानवा होती. वहातुकीसाठी फक्त २६ ट्रक्स हाताशी होत्या! त्यामुळे रसदीचा पुरवठा बैलगाड्यातून किंवा जवानांच्या डोक्यांवर पोती लादून करावा लागला. जपानी सैन्याला विमानाचे संरक्षण अजिबातच नव्हते.

या उलट ॲड्मिरल मौंटबॅटनच्या आधिपत्याखाली उभारलेली 'दोस्तांची आग्नेय आशिया आघाडी' (आआआ) हिची तयारी उत्कृष्ट होती. त्यांच्यापाशी जवळ जवळ चार लाख जवान होते. ईशान्य हिंदुस्थानावर होणारा हल्ला परतवण्याचीच नव्हे तर पुढे चाल करून ब्रह्मदेश जिंकण्याची तयारी त्यांनी केली होती. या पायदळाला विमानदलाचा भक्कम पाठिंबा होता. त्या वेळची आसाम राजधानी शिलाँग इथे (आताच्या) भारतीय विमानदलाचे संग्रहालय आहे. विमानदलाने इंफाळच्या लढाईत काय कामगिरी केली

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

याची छायाचित्रे तेथे पाहायला मिळतात. सारांश, ब्रिटिशांच्या 'आग्नेय आशिया आघाडी'च्या सामर्थ्यापुढे जपानी फौजा व आझाद हिंद फौज यांचे संयुक्त बळ अगदीच नगण्य होते.

त्यामुळे खरे तर युद्ध सुरू होण्यापूर्वीच त्याचा निर्णय ठरल्यात जमा होता; परंतु या मोहिमेचा शेवट इतक्या भीषण पराभवाने होईल अशी अपेक्षा नव्हती. सुरुवातीला ब्रिटिश सैन्य माघार घेते आहे असे वाटले. पण ती 'आआआ'ची खेळी होती. 'आआआ'ने कोहिमा व इंफाळ या दोन भागात जपानी सैन्य व आझाद हिंद फौज यांना मुद्दामच मुसंडी मारून पुढे घुसण्याची संधी दिली. या मुसंडीबरोबरच सुभाषचंद्र मोईतंगला आले व तेथे त्यांनी आपल्या छोट्या सैन्याकडून मानवंदना स्वीकारली. त्यानंतर सुभाषचंद्र रंगूनला परतले; पण हे पुढे गेलेले सैन्य 'आआआ'ने आपल्या विळख्यात पकडले आणि पूर्णपणे नष्ट केले. जपानी सैन्य आणि आझाद हिंद सेनेचे आघाडीबरोबर असलेले, कर्नल एम्. झेड्. कियानी यांच्या नेतृत्वाखालील पथक शौयाने लढले. पण त्याचा काही उपयोग झाला नाही.

या वेळी झालेल्या लढाईत ६५ हजार जपानी कामास आले. वेढ्यातून निसटून येणारे असंख्य सैनिक हिवताप, नवज्वर, अतिसार अशा आजारांना बळी पडले. पावसामुळे दलदलीच्या प्रदेशात खूप जण फसले. सर्पदंशामुळे पुष्कळ जण मेले. अशी वाताहत होऊन गेली. आझाद हिंद फौजेची एकच तुकडी (मागे सांगितल्याप्रमाणे) आघाडीवर होती. तीपैकी ६०० लोक लढाईत मारले गेले असावेत. पिछाडीवर असणाऱ्यापैकी २००० लोक उपासमार, आजार या कारणांनी मेले.

सुभाषचंद्रांना नामुष्कीची वाटावी अशी गोष्ट म्हणजे आझाद हिंद फौजेपैकी दोन हजार जवान लढाई चालू असतानाच ब्रिटिशांना जाऊन मिळाले. सुभाषचंद्रांना मोठी उमेद होती की, आझाद हिंद फौजेने हिंदुस्थानात प्रवेश करताच 'आआआ'मधील हिंदी जवान व अधिकारी फौजेला येऊन मिळतील व दिल्लीवरील आक्रमणामध्ये सामिल होतील. पण घडले भलतेच. आझाद हिंद फौजेतून ब्रिटिशांना फितूर झालेले सैनिक मात्र दिल्लीला गेले.

(६)

चौदा एप्रिल १९४४ या दिवशी घडलेल्या त्या अभिमानास्पद आणि गौरवशाली मानवंदनेचे स्मारक आम्ही पाहात होतो. आमच्या मनातील देखाव्यात तो तिरंगा ध्वज सुभाषचंद्रांनी दोरी ओढताच वर चढत होता. वाऱ्यावर लहरत होता. सुभाषचंद्र लष्करी पोषाखात, स्वतःच्या कपाळासमोर सलामीच्या स्वीकारासाठी रूबाबात हात लववून उभे होते. हातात बंदुका घेतलेली पाच-सहाशे जवानांची तुकडी टप्-टप् बूट वाजवीत समोरून सरकत होती. प्रसंग हेलावून टाकणारा होता. अंगावर रोमांच उठत होते. पण खरेतर एका अदम्य आकांक्षेने घेतलेल्या भरारीचा तो विषण्ण शेवट होता.

आताची तेथली स्थितीही काही प्रसन्न नव्हती. हे स्मारक भारत सरकारने उभारलेले नाही. सुभाषचंद्रांनी स्थापन केलेल्या 'फॉरवर्ड ब्लॉक' या पक्षाने ते उभे केले आहे. तेथे एक बारके सभागृह, एक लहानसे ग्रंथालय व एक छोटेसे वस्तुसंग्रहालय आहे. बाजूलाच भारतीय सैन्याची रखवालीची चौकी आहे. तीत काही मराठी सैनिकही होते. त्यांना भेटल्याने फार आनंद झाला व त्यांनाही आपुलकीचे भरते आले.

दुपारी ४ वाजता आमची बस इंफाळहून सुटली. मार्ग फार सुंदर होता. दोन्ही बाजूला हिरवळ व पलीकडे गच्च झाडावळ होती. हवा सुखदशीतल होती. पण टप्प्याटप्प्यावर शाळातील मुलामुलींचे थवे भारतीय लष्कराच्या विरोधात फलक फडकावून निदर्शने करीत होते. आमच्या सुखसहल म्हणून सुरू केलेल्या प्रवासाचाही तो विषण्ण शेवट होता.

संदर्भ : ॲन इंडियन फ्रीडम फायटर इन जापान (मेमॉयर्स ऑफ ए. एम्. नायर) ओरिएंट लाँगमन, न्यू दिल्ली १९८२.



अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# वाचकांचा पत्रव्यवहार

श्री. संपादक, नवभारत यांना स. न.

नवभारतच्या ऑगस्ट २००८ च्या अंकात प्रा. र. ग. दांडेकर यांचा 'सामाजिक सुधारणा आणि अंधश्रद्धा' हा लेख आहे. त्यात त्यांनी म्हटले आहे की, "ईश्वराचा जर त्याग केला पाहिजे आणि ईश्वराशिवाय जर धर्म नाही (ईश्वर नाकारणाऱ्या जैन, बौद्धांनी सुद्धा गौतमबुद्धांना आणि महावीरांना 'सर्वज्ञता' प्रदान केली आहे.) तर धर्मनिर्मूलनच अंधश्रद्धानिर्मूलनवादाचे फलित किंवा अंतिम उद्दिष्ट राहील."

या अवतरणातील कंसामधल्या माहितीप्रमाणे जैनांनी महावीराला 'सर्वज्ञता' प्रदान केल्याचे वाचनात येते. पण बौद्धांनी गौतमबुद्धांना 'सर्वज्ञता' प्रदान केल्याचे वाचनात आलेले नाही. लेखकाने ही माहिती पुरवावी ही विनंती.

वरील अवतरणातील कंसामधल्या वाक्यावरून असे वाटते की 'सर्वज्ञता' प्रदान करणे म्हणजे ईश्वर नाकारल्यावरही 'सर्वज्ञता' रूपी ईश्वरत्व प्रदान करणे, पण मग 'सर्वज्ञता' म्हणजे ईश्वर असे घ्यायचे काय?

"सर्वज्ञ के दो अर्थ हो सकते है। और आमतौर से जो गलत अर्थ है दो में, वही प्रचलित है। सर्वज्ञ का एक अर्थ तो होता है, ऑल नोइंग – सब कुछ जानता है। यही अर्थ प्रचलित है। इसलिए ऐसे उदाहरण के लिए जैनों ने महावीर को सर्वज्ञ कहा है। कहा था इसलिए की जब आत्मतत्त्व जान लिया गया तो आदमी सर्वज्ञ हो गया। क्योंकी आत्मतत्त्व का लक्षण है सर्वज्ञ होना – सब जान लिया। महावीर ने खुद कहा है, जिसने एक को जाना उसने सब जान लिया। तो ठीक है, महावीर ने सब जान लिया। तो फिर महावीर को पता होना चाहिए की हवाई जहाज कैसे बनाया जाता है। सर्वज्ञ का अगर यह अर्थ लिया तो बडी भ्रान्ती होगी। और इससे बडी तकलीफ होगी। महावीर को जिस दिन इस तरह सर्वज्ञ माना जैनों ने, उसी दिन तकलीफ में पड गए। फिर उनकी इस बात की बुद्धने बहुत मजाक उडायी। असल में वह महावीर की सर्वज्ञता के अनुयायियों की मजाक है। क्योंकी अनुयायियों ने जो दावा करना शुरू किया वह यह है कि महावीर सब जानते हैं।

सर्वज्ञ का, मेरी दृष्टि में, जो अर्थ है वह यह कि ऐसा कुछ भी नहीं बचता आत्मतत्त्व में, जो जानने योग्य है और न जान लिया गया हो। जो भी जानने योग्य है वह जान लिया गया – आल दैट इज वर्थ नोइंग। बहुतसी बातें मालूम पडती हैं कि जानने योग्य हैं, लेकिन उन्हें जानने से क्या फर्क पडता है। सर्वज्ञ का मेरे लिए जो अर्थ है वह है – ऐसा कुछ भी नहीं बचा जो जानने योग्य है। ऐसा कुछ भी नहीं बचा, जिसके कारण जीवन के आनन्द मे रत्तीभर भी फर्क पडता हो। ऐसा कुछ भी जानने को नहीं बचा जिससे सच्चिदानन्द होने में कोई भी भेद पडता है। रास्ता यह बायें जाता है तो पहुंचता होगा कही। रास्ता दायें जाता है तो पहुंचता होगा कहीं, लेकिन इससे सच्चिदानन्द स्वरूप में कोई फर्क नहीं पडता है।"

(ओशो/असतो मा सद्‌गमय/आवृत्ती १९७९, पान ४२६ ते ४२९)

यावरून लक्षात येईल की ईश्वर म्हणजे कोणी व्यक्ती नसून ती स्थिती आहे. आणि सर्वज्ञता म्हणजे शाश्वत, नित्य आनंदाची स्थिती. 'आनंदाचे डोही आनंद तरंग। आनंदचि अंग आनंदाचे।।'

दांडेकरांच्या लेखातील विवेक, ईश्वर या शब्दांबद्दल पुन्हा केव्हांतरी विवेचन करण्यात येईल.

देवीदास बागूल
६५/२०, एरंडवणे, कृपांजली,
पुणे – ४११ ००४.



अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| ❑ वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| ❑ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु. |
| ❑ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु. |
| ❑ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु. |
| ❑ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु. |
| ❑ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु. |
| ❑ तरंगयामिक व पुंजयामिक । मा. ग. टोळे | २० रु. |
| ❑ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | १५० रु. |
| ❑ वागीश्वरी । डॉ. गो. के. भट | ६० रु. |
| ❑ प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले | ५० रु. |
| ❑ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ४० रु. |
| ❑ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु. |
| ❑ दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद पाटील | १५० रु. |
| ❑ शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु |
| ❑ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १४० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु |
| ❑ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य • | ५० रु. |
| ❑ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु |
| ❑ पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ६० रु. |
| ❑ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | ३० रु. |
| ❑ कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य । रा. भा. पाटणकर | १०० रु. |
| ❑ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि. के. बेडेकर | ३० रु |
| ❑ आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार | १०० रु |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु |
| ❑ इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | १२० रु |
| ❑ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु. |
| ❑ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु |
| ❑ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |
| ❑ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द. ना. धनागरे | ४० रु. |
| ❑ प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु |
| ❑ हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु |
| ❑ पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) । प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु |

१) ग्रंथालय व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)

... जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून ... प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका